No. 16



॥ श्री ॥

# बृहज्जातक.

(दैवज्ञानाचें "सूक्ष्मदर्शक.")

श्रीमत् वराहमिहिराचार्यकृत.

याचें मराठी भाषांतर,

भट्टोत्पलटीकेच्या आधारानें

यथामति

माधवराव ब्रह्माजी संगमनेरकर

यांनीं करून

लोकोपकारार्थ



मुंबईत:

"निर्णयसागर" छापखान्यांत छापविलें.

---

श्लोक.

"ग्रहा राज्यं प्रयच्छंति ग्रहा राज्यं हरंति च।
"ग्रहैर्व्याप्तं सर्वमिदं त्रैलोक्यं सचराचरम् ॥"

---

शके १७९६ अधिक आषाढ मास.—सन १८७४.

सन १८६७ चा आक्ट २५ प्रमाणें ग्रंथ रजिस्टर केला आहे.)

किम्मत १॥. रुपये.

# प्रस्तावना.



आपल्या ह्या भरतखंडांत प्राचीन काळापासून शास्त्रीय विषयावर संस्कृतांत पद्यात्मक गूढ असे अनेक ग्रंथ होत आले व त्यांचा तो गूढपणा टीकाकारांनीं टीकाद्वारें संस्कृतांतच दूर केलेला आहे, तेणेंकरून शास्त्रीय विषयांचें ज्ञान फार दुर्मिल होतें. सांप्रतकाळीं प्राकृत भाषेंत त्यांचीं भाषांतरें होण्याचा प्रघात पडून अनेक ग्रंथ प्रसिद्धीस येऊं लागले, तेणेंकरून सर्वांसच त्या ज्ञानामृताचा लाभ होऊं लागला आहे. त्यांत ह्या त्रिस्कंध ज्योतिषांतील होरास्कंधावर प्राकृतांत झालेले ग्रंथ फारच थोडे आढळतात, व त्यांजवरून समाधान होण्यासारिखें कार्य घडत नाहीं. ह्या शास्त्राचें ज्ञान [illegible]र अपूर्ण असलें तर सत्यतेचा घोटाळा होऊन मिथ्या [illegible]म होतो आणि तेणेंकरून शास्त्रावरील श्रद्धा मात्र [illegible]ाहींशी होऊं लागते.

यास्तव एकादा जातकावरील उत्तम ग्रंथ प्राकृतांत झाला तर ही उणीव बरेच अंशानें नाहींसी होऊन जनांतील मिथ्या भासाचें अज्ञान दूर होईल ह्या हेतूनें सर्वत्र जगन्मान्य असा व अत्यंत प्रौढ जो हा बृह[illegible] ग्रंथ त्याचें महाराष्ट्र भाषांतर जनहितास्तव मी क[illegible]

[illegible]सुखव्यतिरि[illegible]जातकाचे कर्ते श्रीमत् वराहमिहिराचार्य, [illegible] के[illegible] दोन हजार वर्षें होत आलीं; यास एक

प्रमाण आढळलें आहे—श्लोक—"धन्वंतरि क्षपणकामर- "सिंह शंकु वैतालभट्ट घटखर्पर कालिदासा: ॥ प्रोक्तो वरा- "हमिहिरो नृपते: सभायां रत्नानिवै वररुचिर्नवविक्रमस्य ॥" अशीं हीं पंडितरूपी नवरत्नें श्रीनृप विक्रमाचे सभेंत होतीं. तेव्हां विक्रम शकाचें हल्लीं विसावें शतक चालू आहे यास्तव हा ग्रंथ झाल्यास सरासरी दोन हजार वर्षे होत आलीं, हें सयुक्तिक आहे. हा ग्रंथ झाल्यानंतर १,००० एक हजार वर्षांनीं त्यावर श्रीमत् भट्टोत्पला- चार्यांची टीका झाली आहे असें त्यांचेच टीकेच्या अं- तीं प्रमाण आहे, तें असें;—"चैत्रमासस्य पंचम्यां सितायां गुरुवासरे ॥ वस्वष्टाष्टमिते शाके कृतेयं विवृतिर्मया ॥"

हें त्रिस्कंध* ज्योतिष अनेक आचार्यांनीं संस्कृत भा- षेंत वेगवेगळें रचिलें आहे; परंतु अर्वाचीन आचा- र्यांत श्रीमत् वराहमिहिराचार्य यांचे जे जे या त्रिस्कंधा- वर ग्रंथ आहेत ते बहुतेक आचार्यांस संमत व सर्वमान्य असे असून संक्षिप्त होत्साते बहुलार्थक, पुनरुक्तिवर्ज्य, अमौल्य व संपूर्ण विवेचनाचे असे प्रसिद्ध आहेत, त्यांतील जो पहिला होरास्कंध त्याचा हा भाग, ज्यास बृह- ज्जातक असें सर्वत्र प्रमुख अभिधान आहे. बृहत् ह्म-

---

* १ होरा, २ गणित, ३ सिद्धांत. होरा ह्मणजे जातक, त्याचे अध्ययन करणारांचा फलित विषय, गणिताध्यायी यांचा गणित विषय व सिद्धांती यांचा सिद्धांत विषय आणि या त्रिस्कंधांचे जाण- णारांस सांवत्सर ह्मणतात. त्यांचें अध्ययन गर्ग, भृगु, नारद, वसिष्ठ, पराशर, भद्रबाहु, वाराही, इ० संहिता होत.

णजे विशाल—याहून जातकावर दुसरा श्रेष्ठ ग्रंथ झालेला आढळत नाहीं.

ह्या बृहज्जातकाची प्रौढी जितकी वर्णन करावी तितकी थोडीच आहे. ह्याचा प्रत्येक श्लोक तर काय; परंतु प्रत्येक वाक्य, प्रत्येक शब्द, उत्तमोत्तम विचारास्पद आहे. ह्या ग्रंथाचा गूढपणा टीकाद्वारें भट्टोत्पलाचार्यांनींच दूर केला तो त्यांचा उपकार टीका पाहिली ह्मणजे अनुभवी जनांस दिसून येणार आहे. यास्तव विद्यार्थ्यांवर त्यांचे हे मोठेच उपकार आहेत.

महाराष्ट्र भाषेंत या बृहज्जातकावर कोणी टीका केल्याचें आढळत नाहीं, व ज्योतिषसंबंधीच सर्वांस व्युत्पत्ति असून सर्व ग्रंथाभिप्राय जगांत उघडकीस येत नाहीं.तेव्हां जितकें माझ्या मनास उपलब्ध झालें तितकें मूळ व टीकेच्या आधारानें स्पष्ट महाराष्ट्र भाषेंतल्या सुबोध शब्दांनीं व्यक्त करून विद्वज्जनांच्या अवलोकनांत हा ग्रंथ नजर केला आहे. टीकेंत बहुतेक ग्रंथांचीं मतें घेऊन एकनिश्चय केलेला आहे तो त्यांचा कटाक्ष व मूळ श्लोकाचा मुख्यार्थ लक्षांत आणून जितका योग्य विचार त्या संबंधाचा होईल तितका केला व स्वशक्त्यनुसार महाराष्ट्र भाषेंत अर्थ उतरिला आहे.

मी कांहीं विद्वान् नाहीं, यःकश्चित् असंस्कृत, गुरुमुखव्यतिरिक्त, गृहस्थ कोटींतील, कारकुनी पेशांतला, केवळ एक या विषयाचा बहुश्रुतपणानेंच ऊहा-

पोह करणारा, असा आहे. तेव्हां माझी शक्ति विद्वज्जनां पुढें प्रौढी मिरविण्यास काय समर्थ होणार आहे!

परंतु मूळ ग्रंथ प्रौढ असून जगमान्य, ह्याचीं प्रकर लोकोपयुक्त असें जाणून, निदान मजपेक्षां या विषयां कमी ज्ञानाचे असून, ज्यांस प्राकृत कृतीची गोडी त्यांच रितांच हे माझे परिश्रम उपयुक्त होतील, यास्तव "मूळ श्लोकांचा मात्र" प्राकृतार्थ केला आहे.

आतां हा सार्थ ग्रंथ अनेक जन व विद्वज्जन अवलोक करतील, यास्तव त्यांस सविनय अशी प्रार्थना करित कीं, अन्य कोणी ग्रंथकार दोषांविषयीं क्षमा करा असें ह्मणतात; परंतु माझी तर अशीच प्रार्थना आं कीं, त्यांणीं मला क्षमा न करितां स्वपुत्रवत् दोषदर्श करावें, जेणेंकरून सदोषकृत्य निर्दोष करितां येईल असें त्यांणीं अवश्य केल्यास, मी मोठाच त्यांचा आभा मानून झालेले दोष दूर करीन, हेंच विनविणें वारंवा आहे.

नम्रतम,

माधवराव ब्रह्माजी
संगमनेरकर.

# अनुक्रमणिका.

## राशिप्रभेदाध्याय १. पृष्ठ १.

( संज्ञाध्यायः )

## ग्रहयोनिभेद, अध्याय २. पृष्ठ ११,

### ( ग्रहांचे स्वभाव व लक्षणें )

## वियोनिजन्माध्याय ३, पृष्ठ २०.

### ( पशु, पक्षी, वनस्पत्यादिक जन्मपरीक्षा. )



## निषेक अध्याय ४. पृष्ठ २३,

### ( गर्भसंभव ज्ञान )

## जन्मविधि अध्याय ५. पृष्ठ ३४.

### ( जन्माचीं लक्षणें )

## अरिष्टाध्याय ६. पृष्ठ ४४.

### ( मृत्यूचीं लक्षणें )

## आयुर्दाय अध्याय ७. पृष्ठ ४१.

### ( आयुष्यनिश्चय )



## दशांतर्दशाध्याय ८. पृष्ठ ५६.

### ( आयुष्यांतील सुखदुःखांचे भेद )

## अष्टक वर्गाध्याय ९. पृष्ठ ६७.

( लग्न व ग्रहांचीं शुभाशुभ स्थानें )

## कर्माजीवाध्याय १०. पृष्ठ ७२.

(धंदारोजगार)



## राजयोगाध्याय ११. पृष्ठ ७५.

(श्रेष्ठपदाधिकार मिळणें)

जनुत्र असतां पृथ्वीनाथ १४–तोच भूमिपति होणें १५–धर्मात्मा पृथ्वीनाथ हो० १६–दोन प्रकारचे नृपयोग १७– नरेंद्र, प्रजेशयोग १८– राज्यप्राप्तीची दशा १९–राज्यहानीची दशा–भोगी जन्म पावणें २०–भिल्ल चोर स्वामी होण्याचा योग–

## नाभसयोगाध्याय १२. पृष्ठ ८३.

### ( आकाशाचे वेगवेगळ्या भागांत ग्रहांचे योग )

संख्या, आकृति, आश्रय, दल, यांची गणती बत्तिस योगांत होणें–त्यांचे भेद १८०० असणें १–रज्जु, मुसल, नल, हे आश्रय योग–स्रक्, सर्प, हे दलयोग यांचीं लक्षणें २–आश्रययोगासारिखे अन्य योग जे ते एथें कथन केलें नाहींत ३–गदाख्य, शकट, विहंग, शृंगाट, हल, यांचीं लक्षणें–वज्र, यव, कमल, वापी, यांचीं लक्षणें ५–वज्रादियोगावर दोषकथन ६–यूप, शर, शक्ति, दंड यांचीं ल० ७–नौका, कूट, छत्र, चाप, अर्धचंद्र, यांचीं ल० ८–समुद्र, चक्रयोग ल० ९–हा आकृतियोगसंग्रह–संख्यायोगाचे प्रकार, वल्लकी, दामिनी, पाश, केदार, शूल, युग, गोल, योग ल० १०–**ह्या सर्व योगांचीं फळें**–रज्जु, मुसल, नल, स्रक्, सर्प, फळें ११–हे योग निःफल व स्वफल देतात १२–गदा, शकट, विहंग, शृंगाट, हल, यांचीं फळें १३–वज्र, यव, पद्म, वापी फळें १४–यूप, शर, शक्ति, दंड, यांचीं फळें १५–नौ, कूट, छत्र, चाप, यांचीं फळें १६–अर्धचंद्र, समुद्र, चक्र, वीणा, फळें

## राशिशीलाध्यायः १६. पृष्ठ १००.



## दृष्टिफलाध्यायः १७. पृष्ठ ११८.

### ( चंद्रावर अन्यग्रहदृष्टिफळें )

## भावफलाध्यायः १८. पृष्ठ १२२.

(तन्वादि द्वादशस्थानस्थित ग्रहांचीं फळें)



## आश्रय योगाध्यायः १९. पृष्ठ १२६.



## प्रकीर्ण योगाध्यायः २०. पृष्ठ १३१.

(अवांतर योग)

## अनिष्टयोगाध्यायः २१. पृष्ठ १३३.

## स्त्रीजातकाध्याय २२. पृष्ठ १४१.



## निर्याणाध्याय २३. पृष्ठ १४८.

### ( मरणप्रकार व नंतरची गति )

शस्त्र किंवा अग्नीनें—शोष व रक्तकोपानें—दोरी, अग्नि, पतन या योगांनीं इ० मृत्युयोग ३—बंधनानें—मंदिरांत स्त्रीपासूनच इ०मृत्यु योग ४—शूलव्यथेनें, काष्ठताडनानें मृत्यु होणें ५—काष्ठप्रहारानें—धूम, अग्नि, बंधन, ताडन यांहीं मृत्यु ६—शस्त्र, अग्नि, राजकोप यांपासून मृ०—क्षतामध्यें कृमि पडून इ० योग ७—वाहनावरून पतन—यंत्रपीडनानें—दुर्गंधीमध्यें इ० प्रकारानें मृत्यु ८—गुह्यस्थानीं कृमि व शस्त्रादि पीडनानें मृत्यु ९—पक्ष्यापासून—पर्वतावरून, वीज पडून, भिंत पडून इ० प्रकारानें मृत्यु—बाविसावा द्रेष्काण मृत्यूस कारण—त्यांतून कोणाचे स्वामिगुणाप्रमाणेंमृत्यु तें ११—कोणते भूमीवर मृत्यु—भूमीची कल्पना—मूर्छेचा वेळ जाणणें१२ शवपरिणाम—तो जळून, सडून, शोषून, विटंबना होऊन इत्यादि योगांनीं होणें—पूर्वजन्म व पुढील गति इत्यादिक ज्ञान १३—देवलोक, पितृलोक, तिर्यक्लोक, नरकलोक इ० लोकांहून जन्मास येणें—तेथें श्रेष्ठत्व नीचत्व ज्ञान—कोणत्या लोकीं गति होईल—मोक्ष गति होण्याचा योग १५—

नष्टजातक पृष्ठ १५५—द्रेष्काणस्वरूप पृष्ठ १६२—उपसंहार पृष्ठ १७३.

(ह्या अध्यायांच्या अनुक्रमणिकेचें विशेष अगत्य नाहीं ह्मणून येथें विस्तार केला नाहीं).

---

# शुद्धिपत्र.



| अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | पंक्ति. |
|---|---|---|---|
| असा शित्र | अशाशित्र | १ | १२ |
| पुंग | पुंगल | २९ | ३ |
| चतुष्दप | चतुष्पद | ३९ | ९ |
| पाराशर | पराशर | ४९ | २९ |
| गृह | ग्रह | ,, | ७ |
| नवांश | नवांशराशि | ५३ | १९ |
| विकळा | कळा | ५४ | ३ |
| विकळादि | कळादि | ,, | २२ |
| छेदानी | अंशांचे बेरजेनें | ५७ | २४ |
| तृ.<br>चं. ० | तृ.<br>चं. ऽ | ६८ | ५ |
| द्वि<br>ल. ऽ | द्वि<br>ल. ० | ,, | ,, |
| द्वा.<br>बु. ऽ | द्वा.<br>बु ० | ,, | २२ |
| पं.<br>च. ऽ | पं.<br>च. ० | ६९ | ७ |
| प्र.<br>च. ऽ | प्र.<br>च. ० | ,, | २२ |
| जरठः | जठरः | १०८ | १९ |
| सर्व | शव | १५४ | ७ |
| तस्य | अस्य | १७७ | २ |
| जिन | दिन | ,, | ३ |
| कुलोत्पन्न | कुलेसंकृतिगोत्रोत्पन्न | ,, | ४ |

# सूचना.



( कुंडली मांडण्यापेक्षां हें उत्तम. )

☞ **होराचक्र.**—हें स्वकल्पनेनें आह्मीं नवीन तयार केलें आहे. यापासून गणित केल्याशिवाय इंग्रेजी तारिखेवरून इच्छिल्या वेळेचें लग्न त्याचें बारीक नवमांशादिकांसुद्धां काढतां येतें. ग्रह व नक्षत्रें आकाशीं कोणते स्थलीं, कोणते भावावर ( तनु धन इ० ) आहेत इ० ज्ञान प्रत्यक्ष किंवा आरशांत पाहिल्यासारखें एकदम दृष्टीस पडतें, व यावरून मुष्टींतील वस्तु, नष्टवस्तु, वृष्टि इ०सुद्धां सांगण्याचें ज्ञान होतें व हें चक्र ह्या बृहज्जातकांतील संज्ञाध्यायांचे ज्ञानासही फार उपयुक्त असें आहे. किंमत रंगासुद्धां तयार केलेल्या चक्रास आठ आणे ठेविली आहे. पाहिजे असल्यास किंमतीबद्दल रोख किंवा टिकिटा पाठवाव्या ह्मणजे रवाना करण्यांत येईल. समजुतीचा कागदही चक्राबरोबर मुफत देण्यांत येईल.

ठिकाणा—मुंबईंत ग्रांडरोड शास्त्री यांची वाडी. } **माधवराव ब्रह्माजी,** संगमनेरकर.

॥ श्री ॥

# बृहज्जातक मूळ.



## महाराष्ट्र भाषांतरासह प्रारंभ.



॥ शार्दूलविक्रीडित ॥ १

मूर्तित्वेपरिकल्पित:शशिभृतोवर्त्मापुनर्जन्मनामा
त्मेत्यात्मविदांक्रतुश्चयजनांभर्ताऽमरज्योतिषां ॥
लोकानांप्रलयोद्भवस्थितिविभुश्चानेकधाय:श्रुतौ
वाचंन:सददात्वनेककिरणस्त्रैलोक्यदीपोरवि: ॥

**अर्थ**—अनेककिरण त्रैलोक्यदीप रवि जो तो चंद्रमा धारण केलेला असा शिवमूर्तीचें स्वरूप आहे. अपुनर्जन्म जे त्यांचा तो मार्ग आहे. आत्मवेत्ते यांचा तो आत्मा आहे. यज्ञकर्त्यांचा तो यज्ञ आहे. देव आणि ज्योतिर्गण यांचा तो स्वामी आहे. तीनही लोकांची उत्पत्ति, स्थिति व लय यांचा तो नियामक आहे. आणि अनेक प्रकारांनीं श्रुतीचेठायीं वर्णन केलेला, असा अनेककिरणांनीं युक्त जो त्रैलोक्यदीप श्रीसूर्य तो आह्मांस वाणीतें देवो.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ २

भूयोभिःपटुबुद्धिभिः पटुधियांहोराफलज्ञप्तयेश
ब्दन्यायसमन्वितेषुबहुशःशास्त्रेषुदृष्टेष्वपि॥ हो
रातंत्रमहार्णवप्रतरणेभग्नोद्यमानामहंस्वल्पंवृत्त
विचित्रमर्थबहुलंशास्त्रप्लवंप्रारभे ॥

अर्थ—अनेक प्रकारें विशालबुद्धीनें बुद्धिकुशल असें जें तें 'होरातंत्र' हाच कोणी एक महासागर तो तरून जाण्यास, ज्यांचे यत्न निष्फळ झाले आहेत अशांस होराफलज्ञानास्तव, बहुत प्रकारचे न्याययुक्त शब्द शास्त्रांतरीं पाहून, त्यांजकरितां मी ही एक लहानशी 'शास्त्रनौका' जिच्यामध्यें विपुल 'अर्थ' व नानाप्रकारचीं 'वृत्तें' भरिलीं आहेत; अशी आरंभितों.

॥ इंद्रवज्रा ॥ ३

होरेत्यहोरात्रविकल्पमेकेवांछंतिपूर्वापरवर्णलो
पात् ॥ कर्मार्जितंपूर्वभवेसदादियत्तस्यपक्तिंस
मभिव्यनक्ति ॥

अर्थ—'अहोरात्र' यांतील, आदिवर्ण 'अ' व अंत्यवर्ण 'त्र' यांच्या लोपापासून, 'होरा'; अशी एक कोणी कल्पना करितात. पूर्वजन्मीं सत् असत् असें जें कांहीं संपादित कर्म, त्याची परिपक्वता ही 'होरा' (लग्नार्ध) उत्तम प्रकारांनीं प्रगट करित्ये.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ४

कालांगानिवरांगमाननमुरोहृत्क्रोडवासोभृतो
बस्तिर्व्यंजनभूरुजानुयुगुलेजंघेततोंघ्रिद्वयम् ॥

**मेषाश्विप्रथमानवचरणाश्चक्रस्थिताराशयोरा
शिक्षेत्रंगृहर्क्षभानिंभवनंचैकार्थसंप्रत्ययाः ॥**

**अर्थ**—अश्विनी नक्षत्राच्या प्रथम चरणापासून, नव चरणांपर्यंत मेषराशि, या क्रमानें द्वादशराशिचक्रस्थित जो 'काल' त्याचीं **अंगें** मेष शिर, वृषभ मुख, मिथुन वक्षस्थल, कर्क हृदय, सिंह उदर, कन्या कटी, तूळ वस्ती, वृश्चिक लिंग, धन ऊरुद्वय, मकर जानुद्वय, कुंभ जंघाद्वय, मीन चरणद्वय, अशीं बारा अंगें आहेत. आणि त्या मेषादिकांस, राशि, क्षेत्र, गृह, ऋक्ष, भ, भवन, अशीं एकार्थसंज्ञक नामें आहेत.

॥ वसंततिलका ॥ ५

**मत्स्यौघटीनृमिथुनंसगदंसवीणंचापीनरोश्वज
घनोमकरोमृगास्यः ॥ तौलीससस्यदहनाप्लव
गाचकन्याशेषाःस्वनामसदृशाःखचराश्चसर्वे ॥**

**अर्थ**—मीन, दोन मत्स्य;—कुंभ, कुंभधारी पुरुष;— मिथुन, हर्षित विणायुक्त असे स्त्रीपुरुष ;—धन, धनुर्धारी पुरुषास मांड्यांपासून, अश्वाकृति;—मकर, मृगमुख;—तूळ, तुलाधारी पुरुष;—कन्या, नौकेंत धान्य व अग्नि, सह कुमारी, याप्रकारें 'आकृतिविशेष' आहेत. शेष राहिलेल्या (मेष, वृष, कर्क, सिंह, वृश्चिक,) राशि (तारे, ग्रह) आपआपल्या नांवाप्रमाणेंच आहेत.

॥ त्रोटक ॥ ६.

**क्षितिजसितज्ञचंद्ररविसौम्यसितावनिजाःसुर
गुरुमंदसौरिगुरवश्चगृहांशकपाः ॥ अजमृगतौ**

लिचंद्रभवनादिर्नवांशविधिर्भवनसमांशकाधिप तयःस्वगृहात्क्रमशः ॥

**अर्थ**—मेषेचा स्वामी मंगळ, वृषभेचा शुक्र, मिथुनेचा बुध, कर्केचा चंद्र, सिंहेचा सूर्य, कन्येचा बुध, तूळेचा शुक्र, वृश्चिकेचा मंगळ, धनेचा गुरु, मकरेचा शनि, कुंभेचा शनि, मीनेचा गुरु, याप्रमाणें राशि व राशींचे नवमांश यांचे स्वामी होत. नवमांश मोजण्याचा विधि;—मेषाचा आद्य मेषनवमांश, वृषभाचा मकर, मिथुनाचा तूळ, कर्काचा कर्क; असेंच पुनः सिंहेस मेषाद्य, कन्येस मकराद्य या क्रमानें पुनःपुनः मीन राशीपर्यंत जाणावें. आणि 'द्वादशांश' स्वामींचा क्रम स्वराशि स्वामीपासून क्रमानें घ्यावा.

॥ पुष्पिताग्रा ॥ ७

कुजरविजगुरुज्ञशुक्रभागाः पवनसमीरणकौर्पिज्रूकलेयाः॥अयुजियुजितुभेविपर्ययस्थाःशशिभवनालिझषांतमृक्षसंधिः ॥

**अर्थ**—त्रिशांशाधिपांचा क्रमः—विषम राशीस ; मंगळ पांच अंश, शनि पांच अंश, गुरु आठ अंश, बुध सात अंश, शुक्र पांच अंश, असे तीस अंशांचे अधिप पुरे होतात. यांचे व्युत्क्रम क्रमानें सम राशींचे ; तीस अंश मोजावे.—कर्क, वृश्चिक, मीन या राशींचे जे अंत तेच 'ऋक्षसंधि' (गंडांत) असें जाणावें.

॥ यथार्थाग्रा ॥ ८

क्रियतावुरिजितुमुकुलीरलेयपाथोनजूककौर्प्याख्याः॥तौक्षिकआकोकेरोहृद्रोगश्चांत्यभंचेत्थम्॥

अर्थ—मेष क्रिय, वृषभ तावुरि, मिथुन जितुमु, कर्क कुलीर, सिंह लेय, कन्या पाथोन, तूळ जूक, वृश्चिक कौर्प्य, धन तौक्षिक, मकर आकोकेरो, कुंभ हृद्रोग, मीन अंत्यभ, याप्रकारें प्रत्येक राशीस संज्ञा आहेत.

॥ इंद्रवज्रा ॥ ९

द्रेष्काणहोरानवभागसंज्ञास्त्रिंशांशकद्वादशांशसंज्ञितांश्च॥ क्षेत्रंचयद्यस्यसतस्यवर्गोहोरेतिलग्नंभवनस्यचार्धं ॥

अर्थ—एका राशींत दहा दहा अंशांचे तीन भाग, त्या प्रत्येकांस द्रेष्काण संज्ञा आहे. राशीचे नव, नव, भाग एक भाग, तीन अंश व वीस कळांचा होतो, त्यास नवमांश ह्मणतात. राशीचे बारा भाग, एक भाग अडीच अंशांचा त्यास द्वादशांश ह्मणतात. राशीचे तीस भाग, एकभाग एकअंशाचा त्यास, त्रिंशांश अशी संज्ञा आहे, व क्षेत्र ह्मणजे राशि,आणि लग्नास व राशीचे अर्ध यांस 'होरा' असें ह्मणतात. ह्या षड्वर्गांत ज्या ग्रहाचा जो भाग तो त्याचा 'वर्ग' होय.

॥ वसंततिलका ॥ १०

गोजाश्विकर्किमिथुनासमृगानिशाख्याःपृष्टोदयाविमिथुनाःकथितास्तएव ॥ शीर्षोदयादिनबलाश्चभवंतिशेषालग्नंसमेत्युभयतःपृथुरोमयुग्मं ॥

अर्थ—वृषभ, मेष, धन, कर्क, मिथुन, मकर, या साहा राशी 'रात्रबली' व याच मिथुनावांचून, 'पृष्ठोदय':—मिथुन, सिंह, कन्या, तूळ, कुंभ, या पांच राशी 'दिनबली' व 'शीर्षोदय.' आणि मीनराशि 'उभयोदय':—या प्रकारें राशी लग्नीं उदयास असतां जाणावें.

॥ मंदाक्रांता ॥ ११

क्रूरः सौम्यःपुरुषवनितेतेचरागद्विदेहाः प्रागादी
शाः क्रियवृषनृयुक्कर्कटाःसत्रिकोणाः ॥ मार्तंडेंद्वो
रयुजिसमभेचंद्रभान्वोश्चहोरेद्रेष्काणाःस्युःस्वभ
वनसुतत्रित्रिकोणाधिपानां ॥

अर्थ—क्रूर, सौम्य;—व पुरुष, स्त्री;—याप्रमाणें मेषापासून क्रम घ्यावा. आणि चर, स्थिर, द्विस्वभाव, असा तीन तीन राशींचाही क्रम मेषापासून, घ्यावा.—मेष, वृषभ, मिथुन, कर्क ह्यांजपासून, पांच, नव, ह्या राशी पूर्वादि दिशांचा स्वामी होत.—आणि 'सूर्य, चंद्र' या क्रमानें, विषम राशीच्या होरा. व 'चंद्र सूर्य' या क्रमानें सम राशींच्या होरा; या प्रकारें होरास्वामी जाणावे— व द्रेष्काण स्वामीचा क्रमः—पहिला द्रे० स्वा० स्वाधिप, दुसरा द्रे० स्वा० पंचमाधिप, व तिसरा द्रे० स्वा० नवमाधिप, असे द्रेष्काण स्वामी क्रमानें होतात.

॥ इंद्रवज्रा ॥ १२

केचित्तुहोरांप्रथमांभपस्यवांछंतिलाभाधिपतेर्द्वि
तीयाम् ॥ द्रेष्काणसंज्ञामपिवर्णयंतिस्वद्वादशैका
दशराशिपानां ॥

**अर्थ**—कोणीं प्रथम होरा लग्नाधिपतीची व दुसरी लाभाधिपाची, असें ह्मणतात, असेंच द्रेष्काणाविषयीं पण, प्रथम द्रे० लग्नाधिपाचा, दुसरा द्वादशाधिपाचा व तिसरा एकादशाधिपाचा, असें ह्मणतात.

॥ पुष्पिताग्रा ॥ १३

**अजवृषभमृगांगनाकुलीराझषवणिजौचदिवाक**
**रादितुंगाः॥दशशिखिमनुयुक्तिथींद्रियांशैस्त्रिन**
**वकविंशतिभिश्चतेस्तनीचाः ॥**

**अर्थ**—ग्रहांचा उच्च राशी व ते किती अंशापर्यंत परमोच्च आणि; तेथून, ते सातवे राशीस नीच व परमनीच होतात तें खालीं कोष्टकांत दाखविलें आहे.

| सूर्य. | चंद्र. | मंगळ. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. |
|---|---|---|---|---|---|---|
| मेष. | वृष. | मकर. | कन्या. | कर्क. | मीन. | तूळ. |
| १० | ३ | २८ | १५ | ५ | २७ | २० |
| तूळ. | वृश्चि. | कर्क. | मीन. | मकर. | कन्या. | मेष. |
| १० | ३ | २८ | १५ | ५ | २७ | २० |

॥ वसंततिलका ॥ १४

**वर्गोत्तमाश्चरगृहादिषुपूर्वमध्यपर्यंततः शुभफला**
**नवभागसंज्ञाः॥सिंहोवृषःप्रथमषष्ठहयांगतौलिकुं**
**भास्त्रिकोणभवनानिभवंतिसूर्यात् ॥**

**अर्थ**—वर्गोत्तम नवमांश शुभफल देतात. त्यांचा विधी-चरराशींचे आद्य नवमांश हे स्वनवमांश ह्मणून, ते वर्गोत्तम होत, स्थिरराशींचे मध्य नवमांश हे स्वनव-

मांश यास्तव ते वर्गोत्तम, आणि द्विस्वभावराशींचे अंत्य नवमांश हे स्वनवमांश ह्म० ते वर्गो० असें जाणावें.

ग्रहांचीं मूळत्रिकोण स्थानें हीं आहेत.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ग्र. | सूर्य | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि |
| मू. | सिंह | वृषभ | मेष | कन्या | धन | तूळ | कुंभ |

॥ वसंततिलका ॥ १५

होरादयस्तनुकुटुंबसहोत्थबंधुपुत्रारिपत्निमरणा निशुभास्पदायाः॥ रिःफाख्यमित्युपचयान्यरिक र्मलाभदुश्चिक्यसंज्ञितगृहाणिननित्यमेके ॥

**अर्थ**—लग्नास तनु,-द्वितीय स्थानास कुटुंब,-तृ० स्था० सहज,-चतु० स्था० बंधु,-पंच० स्था० पुत्र,-षष्ठस्था० रिपु,-सप्त० स्था० पत्नी,-अष्टम स्था० मृत्यु,-नव० स्था० भाग्य,-दशम स्था० आस्पद,-एका० स्था० आय,-द्वाद० स्था० रिःफ.-अशा संज्ञा आहेत. अरि, (६) कर्म, (१०) लाभ, (११) दुश्चिक्य, (३) हीं 'उपचय' स्थानें आहेत. परंतु कित्येकांचे मतानें हीं निरंतर नाहींत.

॥ वसंततिलका ॥ १६

कल्पस्वविक्रमगृहप्रतिभाक्षतानिचित्तोत्थरंध्रगु रुमानभवव्ययानि॥ लग्नात्चतुर्थनिधनेचतुरस्र संज्ञेद्यूनंचसप्तमगृहंदशर्क्षमाज्ञा ॥

**अर्थ**—लग्नास कल्प, द्वितीय स्थानास स्व, तृती० स्था० विक्रम (पराक्रम,) चतुर्थस्था० गृह, पंचमस्था०

प्रतिभा, षष्ठस्था० क्षत, सप्तमस्था० चित्तोत्थ, अष्ट० स्था० रंध्र, नव० स्था० गुरु, दश० स्था० मान, एका० स्था० भव, द्वाद० स्था० व्यय, या प्रकारें लग्ना-पासून, क्रमानें संज्ञा आहेत. लग्नापासून, चतुर्थ व अष्टम स्थानास 'चतुरस्त्र' व सप्तमास 'द्यून.' दशमास 'आज्ञा' अशा संज्ञा आहेत.

॥ त्रोटक ॥ १७

**कंटककेंद्रचतुष्टयसंज्ञाःसप्तमलग्नचतुर्थखभाना म्॥तेषुयथाभिहितेषुबलाढ्याःकीटनरांबुचराः पशवंश्च ॥**

**अर्थ**—सप्तम, लग्न, चतुर्थ, दशम, या स्थानांस "कंटक, केंद्र, चतुष्टय," अशा संज्ञा आहेत. यांमध्यें सप्तमस्थानीं कीटराशी, लग्नीं मनुष्यराशी, चतुर्थ स्थानीं जलचरराशी, व दशमस्थानीं पशुराशी, असतील तर त्या "बलाढ्य राशी" जाणाव्या.

॥ वसंततिलका ॥ १८

**केंद्रात्परंपणफरंपरतस्तुसर्वमापोक्लिमंहिबुकमंबु सुखंचवेश्म ॥ जामित्रमस्तभवनंसुतभंत्रिकोणं मेषुरणंदशममत्रचकर्मविंद्यात् ॥**

**अर्थ**—केंद्रापासून दुसरें स्थान **पणफर** व तिसरें स्थान **आपोक्लिम** असें सर्व केंद्रांविषयीं जाणावें. चतुर्थ स्थानास "हिबुक," "अंबु," "सुख;" सप्तम स्थानास 'जामित्र;' पंचमस्थानास 'त्रिकोण;' दशमास 'मेषुरण, कर्म;' या प्रकारें संज्ञा आहेत.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १९

होरास्वामिगुरुज्ञवीक्षितयुतानान्यैश्चवीर्योत्कटा
केंद्रस्थाद्विपदादयोन्हिनिशिचप्राप्तेचसंध्याद्वये॥
पूर्वार्ध्येविषयादयःकृतगुणामानंप्रतीपंचतत्। दु
श्चिक्यंसहजंतपश्चनवमंत्र्याद्यंत्रिकोणंचतत् ॥

**अर्थ**—होरा ह्मणजे 'लग्न' आपल्या स्वामीनें अथवा गुरु, बुध यांणीं युक्त किंवा दृष्ट असेल तर तें 'बळिष्ट,' आणि अन्यग्रहयुक्त किंवा दृष्ट असेल तर तें 'निर्बळी' लग्न होतें. मनुष्यराशी दिवसा केंद्रीं असतां बळिष्ट, पशुराशी रात्रीं केंद्रीं असतां बळिष्ट, कीट बहुपद ह्या राशी संध्याद्वयीं केंद्रीं असतां बळिष्ट होतात.— मेषादि कन्यांत राशींचें पूर्वार्धमान मे. २० वृ. २४ मि. २८ क. ३२ सिं. ३६ कं. ४० व तुळादि मीनांत उत्तरार्ध मान—तू. ४० वृ. ३६ ध. ३२ म. २८ कुं. २४ मी. २० या क्रमानें चढतें व उतरतें असें आहे. तृतीय स्थानास 'दुश्चिक्य' नवमास 'तप' 'त्र्याद्य' 'त्रिकोण,' अशा संज्ञा आहेत.

॥ मंदाक्रांता ॥ २०

रक्तःश्वेतःशुकतनुनिभःपाटलोधूम्रपांडुश्चित्रः
कृष्णःकनकसदृशःपिंगलःकर्बुरश्च॥ बभ्रुःस्व
च्छः प्रथममवनाद्येषुवर्णाः प्लवत्वंस्वाम्याशाख्यं
. दिनकरयुताद्भाद्द्वितीयंचवेशी ॥

**अर्थ**—मेष रक्त, वृषभ श्वेत, मिथुन पोपटी, कर्क प्याजी, सिंह बदामी, कन्या चित्रित, तूळ कृष्ण, वृश्चिक

सोनेरी, धन पिंगट, मकर कर्डा, कुंभ मुंगुसवर्ण, मीन मत्स्यवर्ण, या प्रकारें राशींचे वर्ण आहेत, व त्यांचे स्वामी ज्या दिशेचे अधिपति असतील तिकडेस त्यांचें 'प्लवत्व' होय—सूर्यापासून जो द्वितीय राशि त्यास 'वेशी' अशी संज्ञा आहे.

**॥ राशिप्रभेदाध्याय संपूर्ण ॥ १**

---

## ॥ ग्रहयोनिभेदाध्यायः ॥ २

**(ग्रहांचे स्वभाव व लक्षणें.)**

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १

**कालात्मादिनकृन्मनस्तुहिनगुः सत्वंकुजोज्ञोवचो**
**जीवोज्ञानसुखेसितश्चमदनोदुःखंदिनेशात्मजः ॥**
**राजानौरविशीतगुक्षितिसुतोनेताकुमारोबुधः सू**
**रिर्दानवपूजितश्चसचिवौप्रेष्यः सहस्रांशुजः ॥**

**अर्थ**—काल (प्रथमाध्याय श्लोक ४ पाहा) जो त्याचा सूर्य हा आत्मा, चंद्र हें मन, मंगळ हें सत्व, (सामर्थ्य,) बुध ही वाणी, बृहस्पति हें ज्ञानसुख, शुक्र हें काम, रति, व शनैश्चर हें दुःख;—सूर्य राजा, चंद्र राणी, मंगळ सेनापति, बुध युवराज, गुरू शुक्र हे सचिव, मंत्री; शनि, सेवक; असे ग्रहांचे अधिकार आहेत.

॥ शालिनी ॥ २

हेलिःसूर्यश्चंद्रमाःशीतरश्मिर्हेम्नोविज्ज्ञोबोधन
श्चेंदुपुत्रः ॥ आरोवक्रःक्रूरदृक्चावनेयःकोणो
मंदःसूर्यपुत्रोसितश्च ॥

अर्थ—सूर्यास हेली ; चंद्रास शीतरश्मि; बुधास हेम्न-वित्, ज्ञ, बोधन; मंगळास आर, वक्र, क्रूरदृक्; शनीस कोण, मंद, असित. या प्रकारें संज्ञा आहेत.

॥ वसंततिलका ॥ ३

जीवोंगिराःसुरगुरुर्वचसांपतीज्यौशुक्रोभृगुर्भृगु
सुतःसितआस्फुजिच्च॥राहुस्तमोगुरसुरश्चशि
खीतिकेतुःपर्यायमन्यमुपलभ्यवदेच्चलोकान् ॥

अर्थ—गुरूस जीव, आंगिरा, सुरगुरु, वचसांप-ति, ईज्य ;—शुक्रास भृगु, भृगुसुत, सित, आस्फु-जित्.—राहूस तम, अगु, आसुर.—केतूस शिखी. या प्रकारें या व दुसऱ्या शास्त्रांतून उपलब्ध असतील, त्या संज्ञा योजाव्या.

॥ शालिनी ॥ ४

रक्तःश्यामोभास्करोइंदुःगौरश्चवक्रःनात्युच्चौर
क्तगौरः ॥ दूर्वाश्यामोज्ञोगुरुर्गौरगात्रःश्यामःशु
क्रोभास्करीकृष्णदेहः ॥

अर्थ—सूर्य काळसर तांबडा.—चंद्र गौर.—मंगळ अति उंच नव्हे व ताम्र गौर.—बुध काळसर हिरवा,—गुरु गौर,—शुक्र श्याम,—शनि काळा,—या प्रकारें ग्रहांचीं स्वरूपें जाणावीं.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ५।६।७

वर्णास्ताम्रसितातिरक्तहरितव्यापीतचित्रासि
तावन्ह्यंब्वग्निजकेशवेंद्रशचिकाःसूर्यादिनाथाः
क्रमात् ॥ प्रागाद्यारविशुक्रलोहितितमःसौरिंदु
वित्सूरयः क्षीणेंद्वर्कमहीसुतार्कतनयःपापाबुध
स्तैर्युतः ॥ ॥ त्रोटक ॥ बुधसुतौनपुंसकाख्यौ
शशिशुक्रौयुवतीनराश्चशेषाः ॥ शिखिभूखप
योमरुद्गणानांवशिनोभूमिसुतादयः क्रमेण ॥
॥ उपजातिका ॥ विप्रादितःशुक्रगुरूकुजार्कौ
शशीबुधश्चेत्यसितोंत्यजानाम् ॥ चंद्रार्कजीवा
ज्ञसितौकुजार्कौयथाक्रमंसत्वरजस्तमांसि ॥

अर्थ—वरचे ५ । ६ । ७ या श्लोकांचा अर्थ सुगमोपा. यास्तव खालीं कोष्टकांत दाखविला आहे.

| | सूर्य | चंद्र | मंग. | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| रंग.— | ताम्र. | श्वेत. | रक्त. | हरित. | पीत. | चित्र. | कृष्ण. |
| देवता.— | अग्नि. | वरु० | अग्नीकु. | केशव | इंद्र. | इंद्रा० | ब्रह्मा. |
| दिशा.— | पूर्व. | वाय० | दक्षि० | उत्त० | ईशा० | आग्ने० | पश्चि.* |
| पा०शु०— | पाप. | क्षी.पा. | पाप | † | शुभ. | शुभ. | पाप. |
| स्त्री.पुं.— | पुरु. | स्त्री. | पुरु० | नपुं० | पुरु० | स्त्री. | नपुं. |
| तत्व०— | ... | ... | अग्नि. | पृथ्वी. | आका. | जळ. | वायु. |
| वर्ण.— | क्षत्रि. | वैश्य. | क्षत्री. | वैश्य. | ब्राह्म. | ब्राह्म. | अंत्य. |
| गुण.— | सत्व. | सत्व. | तम. | रज. | सत्व. | रज. | तम. |

* राहूची नैर्ऋ. † पापासह पाप.

॥ त्रोटक ॥ ८

मधुपिंगलदृक्चतुरस्रतनुः पित्तप्रकृतिःसविता ल्पकचः॥तनुवृत्ततनुर्बहुवातकफः प्राज्ञश्चशशी मृदुवाक्शुभदृक् ॥

**अर्थ**—मधेच्या रंगासारिखें पिंगट असें नेत्र, चतुरस्र देह, पित्तप्रकृति, अल्पकेश, असें सूर्यलक्षण.—आणि शरीर वर्तुळ, कफवाताधिक्य, ज्ञानी, मधुरवाणी, सुंदर नेत्र, असें चंद्रलक्षण जाणावें.

॥ स्वागता ॥ ९

क्रूरदृक्तरुणमूर्तिरुदारःपैत्तिकःसुचपलःकृश मध्यः॥ श्लिष्टवाक्सततहास्यरुचिर्ज्ञःपित्तमारु तकफप्रकृतिश्च ॥

**अर्थ**—क्रूरदृष्टि, तरुणमूर्ति, उदार, पित्तप्रकृति, उत्तम चपल, शरीर मध्यें कृश, ( दोंदिल नव्हे ) असें मंगळाचें लक्षण होय.—सदाहास्यरुचि, गद्गद भाषण, वात, पित्त व कफ अशी मिश्र प्रकृति हें बुधाचें लक्षण जाणावें.

॥ वंशस्था ॥ १०

बृहत्तनुःपिंगलमूर्धजेक्षणोबृहस्पतिःश्रेष्ठमतिः कफात्मकः॥ भृगुःसुखीकांतवपुः सुलोचनःक फानिलात्मासितवक्रमूर्द्धजः ॥

**अर्थ**—शरीर स्थूळ, पिंगट केश, व नेत्र, श्रेष्ठबुद्धि, कफप्रकृति ; असें गुरूचें लक्षण जाणावें.—सुखी, कांति-

मान् शरीर, सुंदर नेत्र, कफवातप्रकृति, काळे व कुरळे केश, असें शुक्रलक्षण जाणावें.

॥ वसंततिलका ॥ ११

मंदोलस: कपिलदृक्कृशदीर्घगात्र: स्थूलद्विज:परु
षरोमकचोनिलात्मा ॥ स्नाय्वस्थ्यसृक्त्वगथशुक्र
वसा:समज्जामंदार्कचंद्रबुधशुक्रसुरेज्यभौमा: ॥

अर्थ—आळशी, पिंगटनेत्र, कृश, अवयवदीर्घ, स्थूल दंत, तनु व केश हे रूक्ष वातप्रकाति, याप्रमाणें शनिलक्षण जाणावें.—शनि शरीरांतील शिरा, सूर्य अस्थि, चंद्रमा रक्त, बुध त्वचा, शुक्र रेत, गुरु मेद, मंगळ मांस, याप्रमाणें ग्रहांचे विभाग शरीराचे ठायीं आहेत.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १२

देवांब्वग्निविहारकोशशयनक्षित्युत्करेशा:क्रमा
त्वस्त्रंस्थूलमभुक्तमग्निकहतंमध्यंदृढंस्फाटितम् ॥
ताम्रंस्यान्मणिहेमयुक्तिरजतान्यर्काच्चमुक्तायसी
द्रेष्काणै:शिशिरादय:शशुरुचज्ञग्वादिषुद्यत्सुवा ॥

| अर्थ | सूर्य | चंद्र | मंग. | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थानें— | देव, | जल, | अग्नि, | क्रीडा, | भांडार, | शयन, | उकर. |
| वस्त्रें— | स्थूल, | कोरें, | जळकें, | सडकें, | मध्यम, | दृढ, | जीर्ण. |
| धातु— | ताम्र, | मणि, | सुवर्ण, | युक्ति, | रौप्य, | मोती, | शि.लो. |
| ऋतु— | ... | वर्षा. | ग्रीष्म; | शरत्, | हेमंत, | वसंत, | शिशिर, |

हे ऋतु द्रेष्काणावरून जाणावे.

॥ प्रहर्षिणी ॥ १३

त्रिदशत्रिकोणचतुरस्रसप्तमान्यवलोकयंतिचर
णाभिवृध्धित: ॥ रविजामरेज्यरुधिरा: परेच
क्रमशोभवंतिकिलवीक्षणेधिका: ॥

**अर्थ**—सर्व ग्रहांच्या दृष्टि आपल्यापासून,—तृतीयदशमस्थानीं 'एकपाद,'—नवपंचमस्थानीं 'द्विपाद,'—चतुर्थाष्टमस्थानीं 'त्रिपाद,'—व सप्तमस्थानीं 'संपूर्ण,'—या प्रकारें पादवृद्धीनें दृष्टि जाणाव्या, आणि शनीचीतृतीयदशम, गुरूची नवपंचम, व मंगळाची चतुर्थअष्टम, ह्या स्थानीं 'संपूर्ण किंवा विशेष दृष्टि' असते.

॥ वैतालिका ॥ १४

अयनक्षणवासरर्तवोमासोर्ध्धंचसमाश्चभास्करात् ॥
कटुलवणतिक्तमिश्रितामधुराम्लौकषायइत्यपि ॥

| अर्थ- | सूर्य | चंद्र | मंग | बुध | गुरु | शुक्र | शनी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| काळ. | अयन | क्षण | वासर | ऋतु, | मास, | पक्ष | वर्ष, |
| रस. | तिखट, | खारट | कडू | मिश्र, | मधुर, | आम्ल | तुरट. |

॥ शार्दूलविक्रीडित॥ १५

जीवोजीवबुधौसितेंदुतनयौव्यर्काविभौमा: क्रमात्
इंद्वर्काविकुजेंद्विनाश्चसुहृद: केषांचिदेवंमतम् ॥
सत्योक्तेसुहृदस्त्रिकोणभवनात्स्वात्स्वांत्यधीधर्मपा:
स्वोच्चायु:सुखपा:स्वलक्षणविधेर्नान्यैर्विरोधादिति ॥

**अर्थ**—सूर्याचा मित्र बृहस्पति,—चंद्राचे गुरु, बुध;—मंगळाचे शुक्र बुध;—सूर्यावांचून सर्व बुधाचे मित्र;—मंगळावांचून सर्व गुरूचे मित्र,—चंद्रसूर्यावांचून सर्व शुक्राचे

मित्र;—व चंद्र सूर्य मंगळ यांवांचून सर्व शनीचे मित्र;—याप्रकारें कितीएकांचे मतें आहे. परंतु सत्याचार्य यांचें मत असें आहे कीं, आपल्या मूळ त्रिकोण राशीपासून; द्वितीय, द्वादश ; पंचम, नवम ; आपली उच्चराशी ; अष्टम, चतुर्थ; या स्थानांचे स्वामी जे, ते मित्र होत. अन्यस्थानस्वामींशीं स्वलक्षणविधीनें विरुद्ध यास्तव मित्रता होत नाहीं.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १६।१७

शत्रूमंदसितौसमश्चशशिजोमित्राणिशेषारवे स्तीक्ष्णांशुर्हिमरश्मिजश्चसुहृदौशेषाःसमाःशी तगोः॥जीवेंदूष्णकराः कुजस्यसुहृदोरिः सिता कींसमौमित्रेसूर्यसितौबुधस्यहिमगुःशत्रुःसमा श्चापरे ॥ श्री ॥ सूरेः सौम्यसितावरीरविसु तोमध्योपरेत्वन्यथासौम्यार्कीसुहृदौसमौकुजगु रुःशुक्रस्यशेषावरी ॥ शुक्रज्ञौसुहृदौसमःसुर गुरुःसौरस्यचान्येरयोयेप्रोक्ताः स्वत्रिकोणभा दिषुपुनस्तेमीमयाकीर्तिताः ॥

| अर्थ. | मित्र. | सम. | शत्रु. |
|---|---|---|---|
| सूर्य.— | चंद्र, मंग, गुरु. | बुध. | शनि, शुक्र. |
| चंद्र.— | सूर्य, बुध. | मंगळ,गुरु,शुक्र,शनि. | ... |
| मंग.— | गुरु, चंद्र, सूर्य. | शुक्र, शनि. | बुध. |
| बुध.— | सूर्य, शुक्र. | मंगळ, गुरु, शनि. | चंद्र. |
| गुरु.— | सूर्य, चंद्र, मंगळ. | शनी. | बुध, शुक्र. |
| शुक्र.— | बुध, शनि. | मंगळ, गुरु. | सूर्य, चंद्र. |
| शनि— | शुक्र, बुध. | गुरु. | सूर्य,चंद्र,मंग. |

याप्रकारें मी हे, ग्रह आपल्या मूल त्रिकोण स्थानादिकापासून वर सांगितलेल्या विधीनें पुनः स्पष्ट दर्शित केले आहेत. ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १८

अन्योन्यस्यधनव्ययायसहजव्यापारबंधुस्थितास्त
त्कालेसुहृदःस्वतुंगभवनेप्येकेरयस्त्वन्यथा॥द्वेकानु
क्तभपान्सुहृत्समरिपून्संचित्यनैसर्गिकांस्तत्का
लेचपुनस्तुतानधिसुहृन्मित्रादिभिःकल्पयेत् ॥

अर्थ—ग्रह परस्परांच्या द्वितीय, द्वादश; तृतीय, एकादश ; चतुर्थदशम; या स्थानीं असले तर तत्काल मित्र होतात. (आपल्या उच्चराशीस असलेला ग्रह तत्काळ मित्र ; अन्य प्रकारें शत्रु ; असें अन्य आचार्यांचें मत आहे.) द्वितीयस्थान स्वामी, एकस्थानस्थित स्वामी, अन्यस्थान स्थित स्वामी हे क्रमानें मित्र, सम, शत्रु होतात. या प्रकारें वर सांगितलेल्या नैसर्गिकावरून, व या तात्कालिकावरून, मित्रामित्र पाहून, अधिमित्र, मित्र ; अधि सम, सम; अधि शत्रु, शत्रु ; इत्यादिक कल्पनेनें उत्पन्न करावे.

॥ दोधक ॥ १९

स्वोच्चसुहृत्स्वत्रिकोणनवांशैःस्थानबलंस्वगृहो
पगतेच॥दिक्षुबुधांगिरसौरविभौमौसूर्यसुतःसि
तशीतकरौच ॥

अर्थ—ग्रह आपल्या उच्च राशीस, मित्र गृहीं, स्वमूल त्रिकोणीं, स्वनवमांशीं व स्वगृहीं असला तर तो 'स्था-

नवळी' होतो.—पूर्वदिशेस बुध गुरु, दक्षिणादिशेस सूर्य मंगळ, पश्चिमेस शनि, उत्तरेस शुक्र चंद्र, हे 'दिग्वळी' होतात.

॥ दोधक ॥ २०

उदगयनेरविशितमयूखौवक्रसमागमगाः परि
शेषाः ॥ विपुलकरायुधिचोत्तरसंस्थाश्चेष्टित
वीर्ययुताःपरिकल्प्याः ॥

अर्थ—सूर्य, चंद्र; उत्तरायणामध्यें असतां;—व मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, हे:—वक्र असतां;—चंद्राशीं युक्त असतां;—विपुल तेजयुक्त असतां;—युतीचे ठायीं, उत्तरेस असतां;—"चेष्टावळी" होतात.

॥ मालिनी ॥ २१

निशिशशिकुजसौराःसर्वदाज्ञोन्हिचान्यबहुल
सितगताःस्युःक्रूरसौम्याः क्रमेण ॥ द्व्ययनदि
वसहोरामासपैःकालवीर्यंशकुबुगुशुचसाद्यावृ
द्धितोवीर्यवंतः ॥

अर्थ—चंद्र, मंगळ, शनि हे 'रात्रिवळी,'—बुध 'सर्वकाळवळी,'—सूर्य, गुरु, शुक्र, हे 'दिवावळी,'—क्रूरग्रह 'कृष्ण पक्षीवळी,'—सौम्यग्रह. "शुक्लपक्षीवळी,'—आणि वर्ष, मास, दिवस, होरा यांचे अधिप "स्वकाळीं वळी,"—शनि, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, चंद्र, सूर्य, हे अनुक्रमानें "एकएकापेक्षांअधिकवळी."—असें जाणावें.

॥ इति ग्रहयोनिभेदाध्याय संपूर्ण ॥ २

———

## ॥ वियोनिजन्माध्याय. ॥ ३

(पशु, पक्षी, वनस्पत्यादिक जन्मपरीक्षा.)

॥ वसंततिलका ॥ १

क्रूरग्रहैःसुबलिभिर्विबलैश्चसौम्यैःक्लीबेचतुष्टय गतेतद्वेक्षणाद्वा ॥ चंद्रोपगद्विरसभागसमानरू पंसत्वंवदेद्यदिभवेत्सवियोनिसंज्ञा ॥

**अर्थ**—राशीच्या द्वादशांशीं चंद्रमा असेल, त्या द्वादशांशाचे गुणाप्रमाणें त्या वियोनिजन्माच्या स्वरूपाची व सामर्थ्याची कल्पना करावी. जर तो चंद्र द्वादशांश, 'वियोनि संज्ञक' असेल तर—किंवा लग्न क्रूरग्रहांनीं 'उत्तमबळी,' व सौम्य ग्रहांनीं 'हीनबळी,' असे असून, नपुंसकग्रह केंद्रीं,—किंवा केंद्रीं नसतील तर अन्यस्थानापासून, त्यांची लग्नावर दृष्टि असली,—ह्मणजे तो 'वियोनिजन्म' निश्चित होतो.

॥ वैतालिका ॥ २

पापाबलिनः स्वभागगाः पारक्येविबलाश्चशोभनाः ॥ लग्नंचवियोनिसंज्ञकंदृष्ट्वा त्रापिवियोनिमादिशेत् ॥

**अर्थ**—पापग्रह बळवान असून स्वनवमांशीं, व सौम्य ग्रह बळहीन असून, पर नवमांशीं असतील तर त्या लग्नीं तो 'वियोनिजन्म' जाणावा. या स्थळींही वर सांगितलेलें, वियोनिसंज्ञक लक्षण (चंद्रद्वादशांशादि) पाहून, निश्चय करावा.

॥ उपजातिका ॥ ३

क्रियःशिरोवक्त्रगलेवृषोन्येपादांसकंपृष्ठमुरोथ पार्श्वे ॥ कुक्षिस्त्वपानांघ्र्यथमेढ्रमुष्कौस्फिक्पुच्छमित्याहचतुष्पदांगे ॥

अर्थ—मेष शिर; वृषभ मुख, गळा; मिथुन खांदे व पाय; कर्क पाठ ; सिंह छाती; कन्या फासोळ्या; तूळ कुशी; वृश्चिक गुद; धन मागचे पाय; मकर वृषण व लिंग; कुंभ-ढुंग; मीन पुच्छ; या प्रकारें जनावरांचीं अंगे सांगितलेलीं आहेत.

॥ वैश्वदेवी ॥ ४

लग्नांशकाद्ग्रहयोगेक्षणाद्वावर्णान्वदेद्बलयुक्ताद्वियोनौ ॥ दृष्ट्यासमानाप्रवदेत्स्वसंख्ययारेखांवदेत्स्मरसंस्थैश्चपृष्ठे ॥

अर्थ—लग्नाचा नवमांश, किंवा लग्नीं ग्रह असेल किंवा लग्नावर ज्या ग्रहाची दृष्टि असेल, त्यावरून, त्याच्या रंगाप्रमाणें ( अ० २ श्लोक ५ पहा ) रंग सांगावा. लग्नावर अनेक दृष्टि असतील तर बळवान् दृष्टीप्रमाणें; व समान दृष्टि असल्या तर तितके 'मिश्ररंग' सांगावे. आणि " पाठीवरील रेषा " सप्तमस्थग्रहाचे रंगाप्रमाणें सांगावी.

॥ वंशस्था ॥ ५

खगेदृक्काणेबलसंयुतेनवाग्रहेयुक्तेचरभांशकोदये ॥ बुधांशकेवाविहगाःस्थलांबुजाः शनैश्चरेंद्वीक्षणयोगसंभवाः ॥

**अर्थ**—जन्मसमयीं पक्षी द्रेष्काण असेल, किं० लग्नीं चर नवमांशीं बळीष्ट ग्रह असेल, किं० लग्नीं बुध नवमांशीं बळीष्ट ग्रह असेल, तर अशा ह्या तीनही योगांवर शनीची दृष्टि असतां, 'स्थलपक्षीं' जन्म; व चंद्राची दृष्टि असतां 'जलपक्षीं' जन्म; असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ ६

होरेंदुसूरिरविभिर्विबलैस्तरूणांतोयस्थलेतरु
भवांशकृत:प्रभेद: ॥ लग्नाद्ग्रह: स्थलजलर्क्ष
पतिस्तुयावांस्तावंतएवतरव:स्थलतोयजाता: ॥

**अर्थ**—लग्न, चंद्र, गुरु, व सूर्य हे बळहीन असतील तर 'वृक्षांचें जन्म' जाणावें. व त्यांच्या नवमांशगुणाप्रमाणें, स्थल, जल, असे 'वृक्ष भेद' व लग्नापासून स्थल, जल नवमांश स्वामी जितक्यावे स्थानीं असेल, त्यासंख्येइतकी ती 'वृक्षसंख्या,' असें जाणावें.

॥ मंदाक्रांता ॥ ७

अंत:सारान्जनयतिरविर्दुर्भगान्सूर्यसूनु:क्षीरो
पेतान्तुहिनकिरण:कंटकाढ्यांश्चभौम: ॥ वागी
शज्ञौसफलविफलान्पुष्पवृक्षांश्चशुक्र: स्निग्धा
निंदु:कटुकविटपान्भूमिपुत्रश्चभूय: ॥

**अर्थ**—सूर्याचे अंत:सार (गाभ्यांचे) वृक्ष, शनीचे दुष्ट वृक्ष, चंद्र मधुरवृक्ष, मंगळ कांटेरीवृक्ष, गुरु फलित वृक्ष, बुध नि:फलवृक्ष, शुक्र पुष्पवृक्ष, पुन: चंद्रस्निग्धवृक्ष व मंगळ तीक्ष्णवृक्ष. या प्रकारें "वृक्षांचें जन्मज्ञान" ग्रहावरून जाणावें.

॥ वंशस्था ॥ ८

शुभोशुभर्क्षेरुचिरंकुभूमिजंकरोतिवृक्षंविपरित
मन्यथा ॥ परांशकेयावतिविच्युतस्वकाद्भवं
तितुल्यास्तरवस्तथाभिधाः ॥

अर्थ—अशुभराशीस शुभ ग्रह असतां, वाईट भूमी-
वर उत्तम वृक्ष, व अन्य प्रकारें विपरीत ह्म० शुभराशीस
अशुभग्रह असतां, उत्तम भूमीवर वाईटवृक्ष, व अशुभ
रा० अशुभग्र० वाईट भूमींत वाईट वृक्ष, व शुभ रा-
शीस शुभ ग्रह असतां, उत्तम भूमींत उत्तम वृक्ष, असें
जाणावें. परनवमांशीं ग्रह असतां स्वनवमांशापासून,
जितक्यावे नवमांशीं तो असेल तितक्या संख्येइतक्ये
व त्या जातीचे वृक्ष होतात असें जाणावें.

॥ वियोनिजन्माध्याय संपूर्ण ॥ ३

---

## । निषेकाध्यायः । ४

( गर्भसंभव ज्ञान )

॥ वंशस्था ॥ १

कुजेंदुहेतुप्रतिमासमार्तवंगतेतुपीडर्क्षमनुष्णदी
धितौ ॥ अतोन्यथास्थेशुभपुंग्रहेक्षितेनरेणसंयो
गमुपैतिकामिनी ॥

अर्थ—मंगळ व चंद्र हे प्रतिमाशीं 'आर्तव प्राप्तीस कार-
ण' आहेत. चंद्र स्त्रीच्या नेष्ट राशीस गेला ह्मणजे

'रजोदर्शन' होतें. सांगितल्या प्रकाराहून चंद्र अन्यप्रकारें पुरुषाचे इष्टराशीस असून, शुभ पुंग्रहाच्या दृष्टीने युक्त असेल, तर 'स्त्री पुरुषाशीं संभोग करिते.' (त्या संधीस मंगळाची दृष्टि जर चंद्रावर असल तर 'गर्भधारणाधिकार' होतो.)

॥ इंद्रवज्रा ॥ २

यथास्तराशिमिथुनंसमेतितथैववाच्योमिथुनप्रयोगः ॥ असद्ग्रहालोकितसंयुतेस्तेसरोषइष्टैः सविलासहासः ॥

**अर्थ**—संभोग लग्नाचें सप्तमस्थान राशीच्या स्वभावाप्रमाणें 'मैथुन प्रकार' जाणावा. सप्तमस्थानावर इष्ट किंवा अनिष्ट ग्रहांची दृष्टि असेल, किंवा ते त्या स्थानींच असतील, तर त्यांचे स्वभावाप्रमाणें, क्रोध किंवा विलास हास्यादि प्रकारें तो संभोग होईल.

॥ वंशस्था ॥ ३

रवींदुशुक्रावनिजैःस्वभागगैर्गुरौत्रिकोणोदयसंस्थितेपिवा ॥ भवत्यपत्यंहिविबीजिनामिमेकराहिमांशोर्विदृशामिवाफला ॥

**अर्थ**—मैथुनवेळीं सूर्य, चंद्र; शुक्र, मंगळ; हे स्वनवमांशीं असतील किंवा गुरु त्रिकोणीं अथवा लग्नीं असेल तर, 'गर्भ धारण' होईल. परंतु जे 'हीनबीज' असतील, त्यांस अंधास चंद्रकिरणें जशीं, तद्वत् हे वरचे योग त्यांस निःफल होतात.

॥ वंशस्था ॥ ८

दिवाकरेंद्वोःस्मरगौकुजार्कजौगदप्रदौपुंगयोषितोस्सदा ॥ व्ययस्वगौमृत्युकरौयुतोतथातदेकदृष्ट्यामरणायकल्पितौ ॥

अर्थ—संभव लग्नीं सूर्यापासून, सप्तमस्थानीं शनि किंवा मंगळ असेल, तर 'पुरुषास रोगप्रद' आणि चंद्रापासून, असें असेल तर 'स्त्रीस रोगप्रद' असें जाणावें. सूर्याच्या द्वितीय, द्वादशस्थानीं; शनि, मंगळ असले, तर 'पुरुषास मृत्युकारक' व चंद्रास असें असेल, तर 'स्त्रीस मृत्युकारक' आणि सूर्याशीं शनि किं० मंगळ युक्त असेल, किंवा त्या सूर्यावर त्यांतून, एकाची जरी दृष्टि असेल, तरी 'पुरुषास मरण' योग जाणावा.—या प्रकारें चंद्रास योग झाल्यास, 'स्त्रीस मरणप्रद' असें जाणावें.

॥ वंशस्था ॥ ९

दिवार्कशुक्रौपितृमातृसंज्ञितौशनैश्चरेंदुर्निशितद्विपर्ययात् ॥ पितृव्यमातृष्वसृसंज्ञितौचतावथौजयुग्मर्क्षगतौतयोःशुभौ ॥

अर्थ—आधान लग्नीं दिवसाः—सूर्य पिता, व शुक्र माता; रात्रिः—शनि पिता, व चंद्र माता; यांहून विपरीत ह्म० दिवसा शनि असतां, चुलता, चंद्र असतां मातेची बहीण ; रात्रीस सूर्य चुलता व शुक्र मातृभगिनी, असें हे ग्रह विषम व सम राशीस असतां, त्यांस शुभ होतात. ह्म० दिवसा सूर्य विषम राशीस असतां पित्यास शुभ,

रात्रीस अ० चुलत्यास शुभ, दिवसा शुक्र समराशीस अ० मातेस शुभ, व रात्रीस असतां मातेच्या बहिणीस शुभ, रात्रीस शनि वि० रा० अ० पित्यास शुभ व दिवसा चुलत्यास शुभ; चंद्र समराशीस मातेस शुभ, व दिवसा मातेच्या बहिणीस शुभ. या सांगितल्या प्रकाराहून विपरीत असतां अशुभ जाणावें.

॥ वंशस्था ॥ ६

अभिलषद्भिरुदयर्क्षमसद्भिर्मरणमेतिशुभदृष्टिम याते ॥ उदयराशिसहितेचयमेस्त्रीविगलितोडुपतिभूसुतदृष्टे ॥

अर्थ—आधानलग्नीं पापग्रह येत असेल, व लग्नावर शुभ ग्रहाची दृष्टि नसेल तर, किं० आधानलग्नीं शनि असून, त्यावर क्षीण चंद्राची किं० मंगळाची दृष्टि असेल, तर ह्या दोनही योगांवर 'स्त्रीस मृत्युकारक' होय.

॥ वैतालिका ॥ ७

पापद्वयमध्यसंस्थितौलग्नेंदुनचसौम्यवीक्षितौ ॥
युगपत्पृथगेववाहेदेन्नारीगर्भयुताविपद्यते ॥

अर्थ—आधानकाळीं लग्न व चंद्र हे दोनही, पापग्रहांच्यामध्यें सांपडले असतील, व त्यांवर शुभग्रहांची दृष्टिही नसेल तर, किं० तें लग्न व चंद्र हे वेगळाले दोन पापग्रहांच्या मध्यें असतील व त्यांवर शुभ दृष्टि नसेल तर या दोनही योगांवर ' स्त्रीस गर्भयुक्त असतां मरण' जाणावें.

॥ वैतालिका ॥ ८

क्रूरैःशशिनश्चतुर्थगैर्लग्नाद्वानिधनाश्रितेकुजे ॥
बंध्वंत्यगयोःकुजार्कयोःक्षीणेंदौनिधनायपूर्ववत् ॥

अर्थ--आधान लग्नापासून किं०--चंद्रापासून चतुर्थस्थानीं क्रूर व अष्टमस्थानीं मंगळ येईल तर; किं०--क्षीण चंद्र असून चतुर्थस्थानीं मंगळ व द्वादशस्थानीं सूर्य येईल तर; "वरप्रमाणें मरणयोग" जाणावा.

॥ वैतालिका ॥ ९

उदयास्तगयोःकुजार्कयोर्निधनंशस्त्रकृतंवदेत्तथा ॥
मासाधिपतौनिपीडितेतत्कालेस्त्रवणंसमादिशेत् ॥

अर्थ--आधान लग्नीं मंगळ व सप्तमस्थानीं सूर्य असल्यास त्या स्त्रीस "शस्त्राचे संबंधानें मृत्यु" किंवा ज्या काळीं मासपति पीडित असेल, त्या मासीं 'गर्भस्राव' होईल असें जाणावें.

॥ वंशस्था ॥ १०

शशांकलग्नोपगतैःशुभग्रहैस्त्रिकोणजायाऽर्थसु
खास्पदस्थितैः ॥ तृतीयलाभर्क्षगतैश्चपापकैःसु
खीतुगर्भोरविणानिरीक्षितः ॥

अर्थ--आधानलग्न व चंद्र यांशीं शुभ ग्रह युक्त असतील, किंवा नव, पंचम; द्वितीय, सप्तम; चतुर्थ, दशम; या स्थानीं शुभ ग्रह असून, पापग्रह तृतीय, लाभ; या स्थानीं असतील तर "गर्भ सुखी असेल." जर त्या लग्न व चंद्रावर सूर्याची दृष्टि असेल तर.--

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ११

ओजर्क्षेपुरुषांशकेषुबलिभिर्लग्नार्कगुर्विंदुभिःपुं
जन्मप्रवदेत्समांशकगतैयुग्मेषुतैर्योषितः ॥ गु
र्वर्कौविषमेनरंशशिसितौवक्रश्चयुग्मेस्त्रियंद्व्यंग
स्थाबुधवीक्षणाच्चयमलौकुर्वंतिपक्षेस्वके ॥

**अर्थ**--लग्न, सूर्य, गुरु, चंद्र; हे विषमराशीस पुरुष नवमांशीं असतील तर, 'पुरुष जन्म;'–आणि तेच समराशीस स्त्रीनवांशीं असतां 'स्त्री जन्म ;'–गुरु, सूर्य हे विषम राशीस असतां 'पुरुष जन्म;' व चंद्र, शुक्र, मंगळ हे समराशीस असतां 'स्त्री जन्म;'–द्विस्वभाव राशीवर असेच हे ग्रह असतां, त्यांवर बुधाची दृष्टि असेल तर "जुळें;" ते आपल्या स्वभावाप्रमाणें पुरुष किं० स्त्री किं० मिश्र, असें करितात.

॥ उपेंद्रवज्रा ॥ १२

विहायलग्नंविषमर्क्षसंस्थः सौरोपिपुंजन्मकरो
विलग्नात् ॥ प्रोक्तग्रहाणामवलोक्यवीर्यंवाच्यः
प्रसूतौपुरुषांगनावा ॥

**अर्थ**—लग्नाशिवाय लग्नापासून, विषम राशीस विषम स्थानीं, शनिही 'पुरुषजन्म' करणारा होतो. वर सांगितलेल्या ग्रहांचें बळाबळ पाहून "जन्मकाळींही पुरुष किंवा स्त्री जन्म सांगावा."

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १३

अन्योन्यंयदिपश्यतःशशिरवीयद्यार्किसौम्यावपि
वक्रोवासमगंदिनेशमसमेचंद्रोदयौचेत्स्थतौ ॥

युग्मौजर्क्षगतावपींदुशशिजौभूम्यात्मजेनेक्षितौ
पुंभागेसितलग्नशीतकिरणाःस्युःक्लीबयोगास्मृताः॥

अर्थ—समराशीस चंद्र व विषम राशीस सूर्य असून, परस्पर पाहात असतील तर; किं०—समराशीस शनि व विषम राशीस बुध असतां परस्पर दृष्टियुक्त असतील तर; किं०—मंगळ विषम राशीस व सूर्य समराशीस असून परस्पर दृष्ट असतील तर; किं०—लग्न चंद्र हे विषम राशीस असून सम राशीवर असलेल्या मंगळाची त्यांवर दृष्टि असेल तर; किं०—चंद्र सम राशीस व बुध विषमराशीस असून त्यांवर कशाही मंगळाची दृष्टि असेल तर; किं०—शुक्र, लग्न, चंद्र हे पुरुष नवमांशीं जर असतील तर;—या प्रकारें हे साहा योग 'क्लीब ह० नपुंसक जन्माचे' जाणावे.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १४

युग्मेचंद्रसितौतथौजभवनेस्युर्ज्ञारजीवोदयालग्नें
दुनृनिरीक्षितौचसमगौयुग्मेषुवाप्राणिनः॥कुर्युस्ते
मिथुनेग्रहोदयगतान्द्व्यंगांशकान्पश्यतिस्वांशेज्ञे
त्रितयंज्ञगांशकवशाद्युग्मंत्वमिश्रैःसमम् ॥

अर्थ—चंद्र, शुक्र हे सम राशीस असून, बुध, मंगळ, गुरु, लग्न; हे विषम राशीस, असतील तर 'कन्यापुत्रांचें जुळें'—लग्न, व चंद्र हे सम राशीस असून, त्यांवर पुरुष ग्रहाची दृष्टि असेल तर 'कन्यापुत्रांचें जुळें;' किं०—बुध, मंगळ, गुरु, लग्न, हे सम राशीस बळीष्ट असतील

तर 'कन्यापुत्रांचें जुळें;' किं०—सर्व ग्रह व लग्न हे द्विस्वभाव नवमांशीं असून, स्वनवमांश स्थित बुधाच्या दृष्टीनें युक्त असतील तर त्या 'जुळयांत तिसरा गर्भ' त्याच्या नवमांशाप्रमाणें ह्म० मिथुनास पुरुष, व कन्येस स्त्री असें जाणावें.—व तेच सर्व ग्रह (बुधासह) व लग्न हें समविषम असें मिश्र व द्विस्वभाव नवमांशीं नसून; अमिश्र असतील तर 'त्या जातीसमान तीनही गर्भ' असें जाणावें.

॥ उपजातिका ॥ १९

धनुर्धरस्यांत्यगतेविलग्नेग्रहैस्तदंशोपगतैर्बलिष्टैः ॥ ज्ञेनार्किणावीर्ययुतेनदृष्टेसंतिप्रभूताअपिकोशसंस्थाः ॥

अर्थ—धन लग्न धन नवमांशीं असून, ग्रह कोठेंही धन नवमांशींच असतील व त्यांवर बळिष्ट अशा बुध शनींच्या दृष्टि असताल तर, 'बहुगर्भसंभव' योग जाणावा.

॥ त्रोटक ॥ १६

कललघनांकुरास्थिचर्मांगजचेतनताःसितकुजजीवसूर्यचंद्रार्किबुधाःपरतः॥उदयपतयचंद्रसूर्यनाथाःक्रमशोगदिताःभवतिशुभाशुभंचमासाधिपतेःसदृशं ॥

अर्थ—खालीं सांगितल्याप्रमाणें प्रत्येकमासीं गर्भस्थिति व त्या त्या मासांचे स्वामी आहेत.

| मास | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| आकृति | कलल | घन | अंकुर | अस्थी | चर्म | नख | केश | चेतना | ,, | ,, |
| स्वामी | शुक्र | मंगळ | गुरु | सूर्य | चंद्र | शनि | बुध | ल. प. | चंद्र | सूर्य |

या प्रकारें मासाधिपति होत. त्यांचे बळाप्रमाणें त्या त्या मासीं गर्भास शुभ किंवा अशुभ स्थिति प्राप्त होते. असें जाणावें.

॥ वंशस्था ॥ १७

त्रिकोणगेज्ञेविबलैस्तथापरैर्मुखांघ्रिहस्तद्विगुणस्त
दाभवेत् ॥ अवाग्गवींदावशुभैर्भसंधिगैःशुभेक्षि
तैश्चेत्कुरुतेगिरंचिरात् ॥

अर्थ—बुध नव, पंचमस्थ असून, अन्य ग्रह बळहीन असे कोठेंही असतील तर; "मुख, पाद, हस्त यांचा द्विगुणित गर्भसंभव"–चंद्र अशुभ असा वृषभ राशीस असून, राशीसंधीच्या नवमांशीं (गंडांत नवमांश) असेल; तर 'मूकत्व,' जर त्यावर शुभग्रहांची दृष्टि असेल तर "काळें-करून वाणी प्राप्त" होईल.

॥ मंदाक्रांता ॥ १८

सौम्यरक्षांशेरविजरुधिरौचेत्सदंतोत्रजातःकु
ब्जःस्वर्क्षेशशिनितनुगेमंदमाहेयदृष्टे॥पंगुर्मी
नेयमशशिकुजैर्वीक्षितेलग्नसंस्थेसंधौपापेशशि
निचजडःस्यान्नचेत्सौम्यदृष्टः ॥

अर्थ—शनि, मंगळ, हे बुधाचे नवमांशीं; किंवा–त्याचे राशीस असतील तर 'सदंत जन्म',–चंद्र स्वगृहींचा लग्नीं असून, शनिमंगळांची त्यावर दृष्टि असेल तर, 'कुब्ज ज०' मीन राशी लग्नीं असून त्यावर शनि, चंद्र, मंगळ, यांची दृष्टि असेल, तर 'पंगुज०';–चंद्र व पापग्रह हे राशी सं-

धीच्या (गंडांत) नवमांशीं असतील, तर 'जडज०;'—या प्रकारें या चारही योगांवर सौम्यग्रहांच्या जर दृष्टि नसतील तर असें जाणावें.

॥ दोधक ॥ १९

**सौरशशांकदिवाकरदृष्टेवामनकोमकरांत्यविलग्ने ॥**
**धीनवमोदयगैश्चदृक्काणैःपापयुतैरभुजांघ्रिशिरस्यान्॥**

**अर्थ**—लग्नीं मकर नवमांश असून, त्यांवर शनि, चंद्र, सूर्य, यांची दृष्टि असेल तर 'वामन';—लग्नीं प्रथम द्रेष्काण पापयुक्त असून त्यावर शनि, चंद्र, सूर्य, यांची दृष्टि असेल तर 'शिरोहीनजन्म'—लग्नीं द्वितीयद्रे० पापयुक्त असून, त्यांची दृष्टि असतां, 'भुजाहीन जन्म;'—आणि लग्नीं तृतीय द्रेष्काण पापयुक्त असून, यांची दृष्टि असतां 'पादहीन जन्म;'—असें जाणावें.

॥ हरिणी ॥ २०

**रविशशियुतेसिंहेलग्नेकुजार्किनिरीक्षितेनयनर**
**हितःसौम्यासौम्यैःसबुद्बुदलोचनः॥व्ययगृहगतश्चं**
**द्रोवामंहिनस्त्यपरंरविर्नशुभगदितायोगायाप्याभ**
**वंतिशुभेक्षिताः ॥**

**अर्थ**—सिंह लग्नीं सूर्य, व चंद्र असून, त्यांवर शनि, मंगळांची दृष्टि असेल तर 'नेत्रहीन';—आणि सिंह लग्नीं सूर्य, चंद्र असतां, त्यांवर शुभाशुभ ग्रहांच्या दृष्टि असतील तर 'बुद्बुदाक्ष';—व्ययस्थानीं चंद्रमा असतां 'वाम नेत्रहीन' व त्या स्थानीं सूर्य असतां 'दक्षिण नेत्रहीन';—

या प्रकारें हे व वर सांगितलेले अशुभ योग शुभग्रहांच्या दृष्टी असतां संपूर्ण फळ करीत नाहींत, अपूर्ण योग करितात; असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ २१

**तत्कालमिंदुसहितोद्विरसांशकोयस्तत्तुल्यराशिस हितेपुरतःशशांके ॥ यावानुदेतिदिनरात्रिसमान भागास्तावद्गतेदिननिशोःप्रवदंतिजन्म ॥**

**अर्थ**—आधान काळींचा तत्कालिक चंद्र (राशी, अंश, कळात्मक) ज्या द्वादशांशीं असेल, त्या द्वादशांशींच्या राशिवर तो चंद्रमा दहावे मासीं ज्या संधीस येतो; त्या वेळीं 'गर्भप्रसूति' होये. व तें आधान लग्न (अंशकळात्मक) दिवस रात्रि संज्ञक असेल; त्याचे भागाचे उदयाइतके वेळानें "दिवसा किंवा रात्रीस जन्म" होतो.

॥ मालिनी ॥ २२

**उदयतिमृदुभांशेसप्तमस्थेचमंदेयदिभवतिनिषेकः सूतिरब्दत्रयेण॥शशिनितुविधिरेषद्वादशेब्दे प्रकुर्यान्निगदितमिहचिंत्यंसूतिकालेपियुक्त्या ॥**

**अर्थ**—आधान लग्न शनीच्या नवमांशीं असून, सप्तमस्थानीं जर शनि असेल तर "तीन वर्षांनीं प्रसूति,"—या प्रकारें चंद्रास असें जर असेल तर "द्वादश वर्षांनीं प्रसूति,"—याप्रमाणें या अध्यायांत सांगितलेले योग युक्तीनें जन्मकाळींही योजावे.

॥ **निषेकाध्याय संपूर्ण** ॥

---

## ॥ जन्मविधिर्नामाध्याय ॥ ४

(जन्माचीं लक्षणें)

॥ अनुष्टुप् ॥ १

पितुर्जातःपरोक्षस्यलग्नमिंदावपश्यति ॥
विदेशस्थस्यचरभेमध्याद्भ्रष्टेदिवाकरे ॥

**अर्थ**—जर जन्मलग्नावर चंद्राची दृष्टि नसेल; तर 'पितृ-परोक्ष जन्म'–सूर्य चरराशीस असून, नवमस्थानीं असेल तर "पिता विदेशीं असतां" जन्म होतो.

॥ अनुष्टुप् ॥ २

उदयस्थेपिवामंदेकुजेवास्तसमागमे ॥
स्थितेवांतःक्षपानाथेशशांकसुतशुक्रयोः ॥

**अर्थ**—जन्मलग्नीं शनि असतां,–किं० सप्तमस्थानीं मंगळ असतां,–किं० बुध शुक्र यांच्या मध्यें चंद्रमा असतां,–या तीनही योगांवर 'पितृपरोक्ष जन्म' होतो असें जाणावें.

॥ अनुष्टुप् ॥ ३

शशांकेपापलग्नेवावृश्चिकेशत्रिभागगे ॥
शुभैःस्वायस्थितैर्जातःसर्पस्तद्वेष्टितोपिवा ॥

**अर्थ**—चंद्र मंगळाच्या द्रेष्काणीं असून, त्याच्या द्वितीय व एकादश स्थानीं शुभ ग्रह असतील तर 'सर्प जन्म,' किं०–पाप लग्न मंगळाच्या द्रेष्काणीं असून; द्वितीय-

एकादशस्थानीं शुभ ग्रह असतील तर; 'सर्पवेष्टित असा जन्म" होतो.

॥ अनुष्टुप् ॥ ४.

**चतुष्पदगतेभानौशेषैर्वीर्यसमन्वितैः ॥**
**द्वितनुस्थैश्चयमलौभवतःकोशवेष्टितौ ॥**

**अर्थ**—पशु राशीस सूर्य असून, बाकींचे ग्रह सर्व द्विस्वभाव राशीस बळिष्ट असतील;तर 'कोशवेष्टित जुळें' होईल.

॥ अनुष्टुप् ॥ ५

**छागेसिंहेवृषेलग्नेतत्स्थेसौरेथवाकुजे ॥**
**राश्यंशसदृशेगात्रेजायतेनालवेष्टितः ॥**

**अर्थ**—मेष, वृषभ, सिंह, हे लग्नीं शनि किंवा मंगळाशीं युक्त असतील; तर त्या लग्नाचे नवमांश राशीचे अंगास 'नालवेष्टन' (अध्याय १ श्लो० ४ पहा) जाणावें.

॥ वंशस्था ॥ ६

**नलग्नमिंदुंचगुरुर्निरीक्षितेनवाशशांकंरविणास मागतम् ॥ सपापकोर्केणयुतोथवाशशीपरेणजा तंप्रवदंतिनिश्चयात् ॥**

**अर्थ**—लग्न किं० चंद्रावर गुरूची दृष्टि नसेल तर, किं०—चंद्र सूर्य एकत्र असून त्यांवरही गुरूची दृष्टि नसेल तर, किं०—चंद्र पापग्रहांशीं युक्त असेल, किं०—

तो सूर्यांशीं युक्त असेल, तरी 'परजात जन्म' असें निश्चयेंकरून, पूर्व मुनि सांगताहेत.

॥ वैतालिका ॥ ७

क्रूरर्क्षगतावशोभनौसूर्याद्यूननवात्मजस्थितौ॥
बध्यस्तुपिताविदेशगःस्वेवाराशिवशादथोपथि ॥

**अर्थ**—सूर्यापासून, सप्तम, नवम, पंचम या स्थानीं पापग्रह हे क्रूर ग्रहांचे राशीस असतील; तर 'पितृबंधन,' सूर्यस्थित राशीप्रमाणें;—स्थिर असतां स्वदेशीं; चर अ० विदेशीं; द्वि० स्व० असतां मध्यंतरीं; असेल असें जाणावें.

॥ वैतालिका ॥ ८

पूर्णशशिनिस्वराशिगेसौम्येलग्नगतेशुभेसुखे ॥
लग्नेजलजेस्तगेपिवाचंद्रेपोतगताप्रसूयते ॥

**अर्थ**—पूर्ण चंद्र असा स्वराशीस, व बुध लग्नीं, आणि चतुर्थ स्थानीं शुभ ग्रह, असें असेल तर; किं०—जलराशी लग्नीं, व चंद्र सप्तम स्थानीं, असें असेल तर; "नौकेमध्यें जन्म" होतो, असें जाणावें.

॥ वैतालिका ॥ ९

आप्योदयमाप्यगःशशीसंपूर्णःसमवेक्षतेथवा ॥
मेषूरणबंधुलग्नगःस्यात्सूतिःसलिलेनसंशयः ॥

**अर्थ**—जन्मलग्नीं जळराशी व चंद्रही कोठेंतरी जळराशीस असेल तर; किंवा—पूर्ण चंद्र त्या जळलग्नास

पाहात असेल;–किं० जळराशीनें युक्त असा तो चंद्र दशम, चतुर्थ, लग्न या स्थानीं असेल तर; "जळामध्यें जन्म" (समीप) निःसंशय होतो.

॥ वैतालिका ॥ १०

उदयोडुपयोर्व्ययस्थितेगुप्त्यांपापनिरीक्षितेयमे॥
अलिकर्किंयुतेविलग्नगेसौरेशीतकरेक्षितेवटे ॥

अर्थ—जन्मलग्नीं चंद्र व व्ययस्थानीं शनि असून, ते पापग्रहांच्या दृष्टीनें युक्त असतील तर; 'कारागृहीं जन्म,' शनि वृश्चिक किंवा कर्केस असतां, लग्नीं असेल; व त्याजवर चंद्राची दृष्टि असेल; तर "भुयारामध्यें" जन्म होतो. असें जाणावें.

॥ वैतालिका ॥ ११

मंदेऽजगतेविलग्नगेबुधसूर्येंदुनिरीक्षितेक्रमात्॥
क्रीडाभवनेसुरालयेसोखरभूमिषुचप्रसूयते ॥

अर्थ—जलराशीचा शनि लग्नीं असून, त्यावर बुधाची दृष्टि असेल; तर "क्रीडास्थानीं जन्म"–त्यावर सूर्याची दृष्टि असेल; तर "देवालयांत ज०"–त्यावर चंद्राची दृष्टि असेल; तर "उकीरड्यावर ज०."

॥ उपजातिका ॥ १२

नृलग्नगंप्रेक्ष्यकुजःश्मशानेरम्येसितेंदूगुरुरग्निहोत्रे॥
रविर्नरेंद्रामरगोकुलेषुशिल्पालयेज्ञःप्रसवंकरोति॥

अर्थ—मनुष्य राशीचा शनि लग्नीं व त्यावर मंगळाची दृष्टि असेल; तर 'स्मशानांत जन्म'—त्यावर शुक्रचंद्रांची दृष्टि असेल; तर "रम्यस्थानीं ज॰"—गुरूची दृष्टि असतां; "अग्निहोत्रीं ज॰"—सूर्याची दृष्टि असतां; "राजगृह, देवालय, गोशाळा यांत जन्म"—बुधाची दृष्टि असतां; "शिल्प कारखान्यांत ज॰" असें जाणावें.

॥ वैतालिका ॥ १३

राश्यंशसमानगोचरेमार्गेजन्मचरेस्थिरेगृहे ॥
स्वर्क्षांशगतेस्वमंदिरेबलयोगात्फलमंशकर्क्षयोः॥

अर्थ—जन्मराशि व तिचा नवमांश यांमध्यें जें बलवान् असेल तत्सदृश प्राणी जे त्यांचा व्यवहारमार्गासन्निध चर, स्थिर, द्विस्वभाव, या प्रकारचे स्थळीं जन्म जाणावें.—जन्मलग्न स्वनवमांशीं असतां "स्वगृहीं जन्म."

॥ वैतालिका ॥ १४

आरार्कजयोस्त्रिकोणगेचंद्रेऽस्तेचविसृज्यतेंबया॥
दृष्टेमरराजमंत्रिणादीर्घायुःसुखभाक्चसःस्मृतः ॥

अर्थ—मंगळ, शनि, चंद्र हे एकत्र होऊन; नव, पंचम, सप्तम, यांतून एके स्थानीं असतील तर "बाळकास माता टाकिते"—परंतु त्यांवर गुरूची दृष्टि जर असेल; तर "तें दीर्घायु व सुख भोगील" असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ १५

पापेक्षितेतुहिनगावुदयेकुजेस्तेत्यक्तोविनश्यतिकुजार्कजयोस्तथाये ॥ सौम्येपिपश्यतितथाविधहस्तभेतिसौम्येतरेषुपरहस्तगतोप्यनायुः ॥

अर्थ—चंद्र हा लग्नीं व त्यावर पापग्रहांची दृष्टि असून, मंगळ सप्तम स्थानीं असेल तर; "तें बाळक नाश पावेल."—शनि, मंगळ, एकादश स्थानीं असून, त्या लग्नस्थ चंद्रावर सौम्य ग्रहांची दृष्टि असेल तर; त्या ग्रहासारिखे "शुभजनाचे हस्तकीं तें जाईल."—व अन्यग्रह दृष्टीनें "परहस्तींगेलेंतरी, आयुष्यहीन" असें जाणावें. ( गुरुदृष्टीनें आयुष्मान् )

॥ वैतालिका ॥ १६

पितृमातृगृहेषुतद्बलात्तरुशालादिषुनीचगैःशुभैः॥
यदिनैकगतैस्तुवीक्षितौलग्नेंदूविजनेप्रसूयते ॥

अर्थ—पितृ, मातृ, संज्ञक ग्रहांच्या बळाप्रमाणें (निषे० श्लो० ९ पहा) "मातुलीं किं० पितृगृहीं जन्म" जाणावा.—शुभग्रह नीचींचे असतील तर 'वृक्षाखालीं' किं० 'विस्तीर्णस्थळीं' जन्म.—सर्व ग्रह एकस्थानीं जमले असून, ते लग्न व चंद्र यांस जर पाहात नसतील, तर" निर्जनस्थळीं जन्म" (अरण्यांत)असें जाणावें.

॥ मंदाक्रांता ॥ १७

मंदर्क्षांशेशशिनिहिबुकेमंददृष्टेऽब्जगेवातयुक्ते
वातमसिशयनंनीचसंस्थैश्चभूमौ ॥ यद्वद्राशि
र्व्रजतिहरिजंगर्भमोक्षस्तुतद्वत्पापैश्चंद्रात्स्मर
सुखगतैःक्लेशमाहुर्जनन्याः ॥

अर्थ—चंद्र हा शनीशीं युक्त किं०—शनीच्या नवमांशीं ; किं०—शनीच्या दृष्टीनें युक्त ; किं०—जलराशीस किंवा जलनवमांशीं ; किं०—चतुर्थस्थानीं असला ; तर

"अंधकारांत शयन"—एकाहून अधिक ग्रह नीचींचे असतील; तर "भूमीवरच शयन" आणि लग्नराशि ज्या अंगाने उदयास आली असेल, (रा० प्रभे० श्लो० १० पहा) त्याप्रमाणें. "गर्भमोचन;"—पापग्रह चंद्रासह सप्तम किं० चतुर्थस्थानीं असतील; तर "जननीस कष्टकारक" असें पूर्वमुनि सांगतात.

॥ इंद्रवज्रा ॥ १८

स्नेहःशशांकादुदयाच्चवर्तिर्दीपोर्कयुक्तर्क्षवशाच्च राद्यः॥द्वारंचतद्वास्तुनिकेंद्रसंस्थैर्ज्ञेयंग्रहैर्वीर्यसमन्वितैर्वा ॥

अर्थ—चंद्राप्रमाणें तेल; लग्नाप्रमाणें वात; व सूर्याचे राशी व स्थानाप्रमाणें "दीपकचर स्थिर व त्याची स्थानीदिशा"—आणि केंद्रस्थित ग्रहामध्यें जो बळिष्ट असेल (अ० २ श्लो० ५) त्याचे दिशेस "सूतिकागृहाचें द्वार" असें जाणावें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १९

जीर्णसंस्तुतमर्कजेक्षितिसुतेदग्धंनवंशीतगौकाष्ठाढ्यंनदृढंरवौशशिसुतेतन्नैकाशिल्प्युद्भवं॥रम्यंचित्रयुतंनवंचभृगुजेजीवेदृढंमंदिरंचक्रस्थैश्चयथापदेशरचनांसामंतपूर्वांवदेत् ॥

अर्थ—जन्मकाळीं बळवान् जो ग्रह असेल, त्यासारिखें 'सूतिकागृह' जाणावें. शनीचें जीर्ण, मंगळाचें जळकें, (धुरकटही) चंद्राचें नवें, सूर्याचें बहुकाष्ठ अदृढ, बुधाचें चित्रविचित्र, शुक्राचें रम्य नवें चित्रित, गुरूचें

मजबुत बांधलेलें;—आणि राशिचक्राची त्या समयीं जशी रचना असेल, तशी आसपासची रचना कारणें पाहून, कल्पनेनें सांगावी.

॥ दोधक ॥ २०

मेषकुलीरतुलालिघटैःप्रागुत्तरतोगुरुसौम्यगृहेषु ॥
पश्चिमतश्चवृषेणनिवासोदक्षिणभागकरौमृगसिंहौ ॥

अर्थ—मेष, कर्क, तूळ, वृश्चिक, कुंभ, ह्या जन्मलग्नावर किं० लग्नाचे नवमांशावर गृहाचे पूर्व बाजूस;—धन, मीन, मिथुन, कन्या, यांवर उत्तर बाजूस;—वृषभावर पश्चिमेस ;—आणि मकर, सिंह यांवर दक्षिणेस ;—"सूतिकास्थान" जाणावें.

॥ वैतालिका ॥ २१

प्राच्यादिगृहक्रियादयोद्वौद्वौकोणगताद्विमूर्तयः ॥
शय्यास्वपिवास्तुवद्वदेत्पादैःषट्त्रिनवांत्यसंस्थितैः ॥

अर्थ—मेष, वृषभ या लग्नीं किंवा या नवमांशावर पूर्वेस;—मिथुनावर आग्नेयीस;—कर्क, सिंह यांवर दक्षिणेस;—कन्या नैर्ऋत्येस;—तूळ, वृश्चिक, पश्चिमेस;—धन वायव्येस;—मकर, कुंभ उत्तरेस ;—मीन ईशान्येस ;—याप्रमाणें "शय्या ह्म० बाजेचें ठिकाण" सांगावें, व त्या "शय्येचे पाय" तृतीय, षष्ठ, नवम, व्यय, या स्थानस्वरूपाप्रमाणें जाणावे.

॥ अनुष्टुप् ॥ २२

चंद्रलग्नांतरगतैर्ग्रहैःस्युरुपसूतिकाः ॥
बहिरंतश्चचक्रार्धेदृश्यादृश्येन्यथापरे ॥

**अर्थ**—चंद्र व लग्न यांचे मध्यें जितकी ग्रहसंख्या असेल तितक्या "उपसूतिका ह्म० जवळच्या वाया," त्या वेळच्या दृश्य राशिचक्रार्धप्रमाणें बाहेर; व अदृश्य राशिचक्रार्द्धप्रमाणें आंत सांगाव्या. अन्य आचार्यांचें मत याहून उलटे रीतीनें आहे.

॥ दोधक ॥ २३

**लग्ननवांशपतुल्यतनुस्याद्वीर्ययुतग्रहतुल्यतनुर्वा ॥**
**चंद्रसमेतनवांशपवर्णःकादिविलग्नविभक्तभगात्रः ॥**

**अर्थ**—लग्नाच्या नवमांश स्वामीप्रमाणें; किं०—सर्व ग्रहांमध्यें जो अधिक बळवान् असेल त्याचे स्वरूपाप्रमाणें; "बाळकाची शरीराकृति (अ० २ श्लो० ८ ते ११ पहा) जाणावी.—आणि चंद्र राशीच्या नवमांश स्वामीसारिखा "त्याचा रंग" जाणावा.—शिरप्रभृति अवयव लग्नापासून, राशींच्या लहानमोठेपणाचे प्रमाणानें (अ० २ श्लो० १९ पहा) जाणावे.

शार्दूलविक्रीडित ॥ २४

**कंदृक्छ्रोत्रनसाकपोलहनवोवक्त्रंचहोरादयस्ते**
**कंठांसकबाहुपार्श्वहृदयंक्रोडानिनाभिस्ततः ॥ व**
**स्तिःशिश्नगुदेततश्चवृषणावूरूततोजानुनीजंघेंघ्रि**
**त्युभयत्रवाममुदितैर्द्रेष्काणभागैस्त्रिधा ॥**

**अर्थ**—शिर, नेत्र, कर्ण, नासिका, गाल, हनुवटी व मुख; हा प्रथम द्रेष्काण भाग;—कंठ, खांदे, दंड, कुशी, हृदय, उदर, नाभि; हा दुसरा द्रेष्काण भाग;—बस्ति, शिश्न गुद,

वृषण, मांड्या, गुडघे, पोटर्या, पावलें, हा तिसरा द्रेष्काण भाग;—या प्रकारें शरीराचे तीन भाग आहेत; त्यांत उदित चक्रार्धास 'डावें अंग,' व अनुदित चक्रार्धास 'उजवें अंग' असें जाणावें.—

॥ शार्दूलविक्रीडित ॥ २९

तस्मिन्पापयुतेव्रणंशुभयुतेदृष्टेचलक्ष्मादिशेत्स्वर्क्षांशे
स्थिरसंयुतेषुसहजःस्यादन्यथागंतुकः ॥ मंदेश्मानि
लजोग्निशस्त्रविषजोभौमेबुधेभूभुवः सूर्येकाष्ठचतु
ष्पदेषुहिमगौशृंग्यब्जजोन्यैःशुभम् ॥

अर्थ—लग्नाच्या ज्या द्रेष्काणीं जन्म असेल, त्या द्रेष्काणाचे अवयवांचे डावे किंवा उजवे अंगावर कुंडलींतील स्थितीप्रमाणें, पापग्रहांचे ठिकाणीं 'व्रण' व शुभ ग्रहांचे ठिकाणीं "तीळ, मस, चट्टे" होतात. ते ग्रह तेथें प्रत्यक्ष किंवा त्यांची दृष्टि त्या स्थानीं असल्यास, ही उत्पन्न होतात.—ग्रह जर स्वराशीस, स्वनवमांशीं, किं० स्थिर राशीस असतील, तर "तीं चिन्हें जन्माबरोबरच उत्पन्न असतील."—अन्य प्रकारें मागाहून "आगंतुक चिन्हें" होतील.—शनि पाषाण वायूपासून ;—मंगळ अग्नि, शस्त्र, विष, यांपासून; —बुध पृथ्वीपासून; —सूर्य काष्ठ, चतुष्पाद यांपासून;—चंद्र शृंग, जलोद्भव, यांपासून;—बाकींचे गुरु, शुक्र हे शुभ; या प्रकारें शरीरावरील व्रणादिकांचीं कारणें जाणावीं.

॥ हरिणी ॥ २६

**समनुपतितायस्मिन्भागेत्रयः सबुधाग्रहाभवति नियमात्तस्यावाप्तिःशुभेष्वशुभेषुवा ॥ व्रणकृदशुभः षष्ठेदेहेतनोर्भसमाश्रितेतिलकमंसकृद्दृष्टः सौम्यैर्युतश्चसलक्ष्मवान् ॥**

**अर्थ**—तीन ग्रह व चवथा बुध असे एकत्र होऊन, कोणत्याही स्थानीं असतील तर; ( मग ते शुभ किं० पाप असले तरी ) निश्चयेंकरून, ते ( वर सांगितलेले ) 'व्रण मशकादिक प्राप्त' होतील.—षष्ठ स्थानीं पापग्रह असेल, तर लग्नापासून जो साहावा राशि तो कालांग ( अ० १ श्लो० ४ पहा. ) भागाप्रमाणें त्या त्या शरीराचे अवयवावर "व्रण" करील.—आणि तो पापग्रह शुभदृष्ट असेल; तर 'तीळ'—तोच शुभग्रहाशीं युक्त असेल; तर " चिन्ह" करील. असें जाणावें.

॥ जन्मविधिर्नामाध्यायसंपूर्ण ॥ ५

---

## ॥ अरिष्टाध्यायः ॥ ६

(मृत्यूचीं लक्षणें)

॥ विद्युन्माला ॥ १

**संध्यायांहिमदीधितिहोरापापैर्भांतगतैर्निधनाय ॥ प्रत्येकंशशिपापसमेतैःकेंद्रैर्वासविनाशमुपैति ॥**

अर्थ—चंद्राचा होरेमध्यें लग्न उदित असून, संध्यासमय असेल; व पापग्रह हे पापनवमांशीं असतील तर; किं०—चंद्र पापयुक्त असून, प्रत्येक केंद्रही पापयुक्त असेल तर;—"मृत्युकारक" योग जाणावा.

॥ इंद्रवज्रा ॥ २

चक्रस्यपूर्वापरभागगेषुक्रूरेषुसौम्येषुचकीटलग्ने ॥
क्षिप्रंविनाशंसमुपैतिजातःपापैर्विलग्नास्तमयाभितश्च ॥

अर्थ—चक्राच्या (कुंडली) चतुर्थ स्थानापासून दशम स्थानापर्यंत वरचे लग्नाकडील अंगास "पूर्वार्ध," व सप्तम स्थानाकडील अंगास "अपरार्ध" ह्मणावें. तेव्हां चक्राच्या पूर्वार्धीं क्रूर ग्रह व अपरार्धीं सौम्य ग्रह असून, लग्नराशि कीटजाती असेल तर; किं०—पापग्रह लग्न किं० सप्तमस्थानाच्या दोहों बाजूस युक्त असतील तर;—"तत्काळ प्राणनाश" होतो असें जाणावें.

॥ अनुष्टुप् ॥ ३

पापावुदयास्तगतौक्रूरेणयुतश्चशशी ॥
दृष्टश्चशुभैर्नयदामृत्युश्चभवेदचिरात् ॥

अर्थ—जर लग्नीं व सप्तमस्थानीं पापग्रह आणि चंद्रही पापग्रहाशीं युक्त असेल, व त्या चंद्रावर शुभग्रहाची पणदृष्टि नसेल; तर 'शीघ्रमरण' जाणावें.

॥ अनुष्टुप् ॥ ४

क्षीणेहिमगौव्ययगेपापैरुदयाष्टमगैः ॥
केंद्रेषुशुभाश्चनचेत्क्षिप्रंनिधनंप्रवदेत् ॥

**अर्थ**—क्षीणचंद्र द्वादशस्थानीं असून, लग्न व अष्टमस्थानीं पापग्रह, आणि केंद्रीं कोणीही शुभ ग्रह नसेल ; तर 'शीघ्रमरण' जाणावें.

॥ अनुष्टुप् ॥ ५

क्रूरेणसंयुतःशशीस्मरांत्यमृत्युलग्नगः ॥
कंटकात्बहिःशुभैरवीक्षितश्चमृत्युदः ॥

**अर्थ**—चंद्र हा क्रूर ग्रहाशीं युक्त होऊन, सप्तम, अष्टम, लग्न, ह्या स्थानीं असेल, व शुभ ग्रह हे केंद्राबाहेर असून, चंद्रास पाहात नसतील; तर 'मृत्युदायक' असें जाणावें.

॥ पृथ्वी ॥ ६

शशिन्यरिविनाशगेनिधनमाशुपापेक्षितेशुभैरथ
समाष्टकंदलमतश्चमिश्रैस्थितिः॥असद्भिरवलो
कितेबलिभिरत्रमासंशुभेकलत्रसहितेचपापवि
जितेविलग्नाधिपे ॥

**अर्थ**—चंद्र हा षष्ठ किंवा अष्टमस्थानीं असतां, जर त्यावर पापग्रहाची दृष्टि असेल, तर 'तत्काळ मृत्यु'—पण त्या चंद्रावर जर शुभ ग्रहाची दृष्टि असेल; तर 'आठ वर्षें आयुष्य'—जर मिश्र दृष्टि असेल; तर 'चार वर्षें आयुष्य'—शुभग्रह षष्ठाष्टम स्थानीं असून, पाप ग्रह बळिष्ट होत्साते, त्यांस पाहात असतील तर ;—किं० लग्नपती सप्तम स्थानीं पापग्रहाशीं युक्त असतां, त्याणें त्या लग्नपतीस जिंकिलें असेल; तर "एक मासानें मृत्यु" होतो.

॥ मंदाक्रांता ॥ ७

लग्नेक्षीणेशशिनिनिधनंरंध्रकेंद्रेषुपापैः पापांत
स्थेनिधनहिबुकद्यूनयुक्तेचचंद्रे ॥ एवंलग्नेभव
तिमदनच्छिद्रसंस्थैश्चपापैर्मात्रासार्द्धंयदिचनशु
भैर्वीक्षितःशक्तिभृद्भिः ॥

अर्थ—क्षीण चंद्र लग्नीं, आणि अष्टम स्थानीं व केंद्रीं पापग्रह असतील तर;—किंवा पापग्रहांच्या मध्यें,असा चंद्र अष्टम,चतुर्थ, सप्तम,या स्थानीं असेल तर; "मरणयोग" जाणावा.—चंद्र लग्नीं, व पापग्रह सप्तम, अष्टम या स्थानीं असून, त्यांजवर शुभग्रह जर बळिष्ट दृष्टीनें पाहात नसतील तर ; "मातेसह बाळकास मरण" जाणावें.

॥ इंद्रवज्रा ॥ ८

राश्यंतगेसद्भिरवीक्ष्यमाणेचंद्रेत्रिकोणोपगतैश्चपापैः ॥
प्राणैःप्रयात्याशुशिशुर्वियोगमस्तेचपापैस्तुहिमांशुलग्ने॥

अर्थ—राशीच्या अंत्य नवमांशीं चंद्र हा शुभ ग्रहाच्या दृष्टीनें हीन असा व त्याचे नव, पंचम स्थानीं पापग्रह असतील तर; किं०—लग्नीं चंद्र, व सप्तम स्थानीं पापग्रह, असें असेल तर; 'तत्काळ तें बाळक प्राण टाकील.'

॥ हरिणी ॥ ९

अशुभसहितेग्रस्तेचंद्रेकुजेनिधनाश्रितेजननिसु
तयोर्मृत्युर्लग्नेरवौतुसशस्त्रजः ॥ उदयतिरवौशी

तांशौवात्रिकोणविनाशगैर्निधनमशुभैर्वीर्योपेतैः
शुभैर्नयुतेक्षिते ॥

अर्थ—राहुग्रस्त असा चंद्र, पापग्रहाशीं युक्त होत्सा-ता लग्नीं असेल, व मंगळ अष्टमस्थानीं असेल तर; 'माता व बाळक यांस मृत्यु'.—राहुग्रस्त असा सूर्य लग्नीं पापग्रहाशीं युक्त असेल व मंगळही अष्टम स्थानीं असेल तर; "तोमृत्यु शस्त्रापासून होईल" असें जाणावें.—सूर्य किंवा चंद्र हे लग्नीं असून, पापग्रह नव, पंचम व अष्टम स्थानीं असतील; आणि शुभ ग्रह हे बळिष्ट असे त्यांशीं युक्त किंवा त्यांस पाहातही नसतील तर "मृत्युकारक योग" जाणावा.

॥ अपवक्त्रा ॥ १०

असितरविशशांकभूमिजैर्व्ययनवमोदयनैधनाश्रितैः ॥
भवतिमरणमाशुदेहिनांयदिबलिनागुरुणानवीक्षिताः ॥

अर्थ—व्ययस्थानीं शनि, नवमस्थानीं सूर्य, लग्नीं चंद्र, अष्टमस्थानीं मंगळ, असे ग्रह असतां; त्यांवर गुरु जर बळवान् दृष्टीनें पाहात नसेल; तर "त्या प्राण्यास शीघ्र मरण" योग जाणावा.

॥ पुष्पिताग्रा ॥ ११

सुतमदननवांत्यलग्नरंध्रेष्वशुभयुतोमरणायशीत
रश्मिः ॥ भृगुसुतशशिपुत्रदेवपूज्यैर्यदिबलिभि
र्नयुतोवलोकितोवा ॥

अर्थ—चंद्र हा पापग्रहाशीं युक्त असा पंचम, सप्तम, नवम, द्वादश, लग्न, अष्टम ह्या स्थानीं असून ; तो शुक्र, बुध, गुरु, हे बळिष्ट असतां त्यांशीं युक्त किं० दृष्टही नसेल; तर " मरणप्राप्ति " असें जाणावें.

॥ भ्रमरविलसिता ॥ १२

योगेस्थानंगतवतिबलिनश्चंद्रेस्वंवातनुग्रहमथवा ॥
पापैर्दृष्टेबलवतिमरणंवर्षस्यांतोकिलमुनिगदितम् ॥

अर्थ—चंद्र हा, बळिष्ट पापग्रहाच्या स्थानीं किं०—लग्नी येईल तेव्हां; किं०—स्वस्थानीं येईल तेव्हां;—वर्षामध्यें या प्रकारें जेव्हां तो पापग्रहांचा दृष्टित येईल; तेव्हां 'मृत्यु;' असें निश्चयेंकरून, पूर्व मुनि जे त्यांहीं सांगितलें आहे.

॥ अरिष्टाध्यायसंपूर्ण ॥ ६

---

## ॥ आयुर्दायाध्यायः ॥ ७

(आयुष्यनिश्चय)

॥ पुष्पिताग्रा ॥ १

मययवनमणित्थशक्तिपूर्वैर्दिवसकरादिषुवत्स
राःप्रदिष्टाः ॥ नवतिथिविषयाश्विभूतरुद्रैर्दश
सहितादशभिःस्वतुंगभेषु ॥

अर्थ—मय, यवन, मणित्थ, पाराशर, आदिकरून,

यांहीं सूर्यादिग्रह स्वोच्चराशीस असतां, त्यांचीं आयुर्दाय वर्षें या क्रमानें सांगितलीं आहेत.

| सू. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | एकून. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १९ | २५ | १५ | १२ | १५ | २१ | २० | —१२७. |

॥ मंदाक्राता ॥ २

नीचेतोर्द्धंह्रसनिहितस्त्वांतरस्थेनुपातोहोरात्वं शप्रतिममपरेराशितुल्यंवदंति ॥ हित्वावक्रंरिपु ग्रहगतैर्हीयतेस्वत्रिभागः सूर्योच्छिन्नद्युतिषुचद लंप्रोझ्झशुक्रार्कपुत्रौ ॥

अर्थ—तेच ग्रह आपल्या नीचराशीस असतां त्यांचीं वर सांगितलेलीं वर्षें अर्ध प्रमाणानें कमी होतात तीं अशीं.

| सू. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | ए. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ९॥ | १२॥ | ७॥ | ६ | ७॥ | १०॥ | १० | —६२॥ |

यास्तव या अंतरांत असलेल्या ग्रहांचीं आयुर्दाय वर्षें त्रैराशिकाचे प्रमाणानें उत्पन्न करावीं. लग्नाचीं वर्षें, उदयास आलेलें, नवमांशा इतकीं घ्यावीं. अन्य-मतानें राशितुल्य अंकाइतकीं वर्षें घ्यावीं असें आहे. मंगळावांचून; इतर ग्रह शत्रुगृहीं असतां, त्यांचा वर्षसंख्येंतून तिसरा भाग कमी होतो.—शनि, शुक्र, यांवांचून; अस्तंगत असलेल्या ग्रहांचीं अर्ध भागानीं वर्षें कमी होतात.

॥ प्रहर्षिणी ॥ ३

सर्वार्धत्रिचरणपंचषष्ठभागाःक्षीयंतेव्ययभवना

दसत्सुवामम् ॥ सत्स्वर्धंहसतितथैकराशिगा नामेकोंशंहरतिबलीतथाहसत्य: ॥

अर्थ---सुगमोपायास्तव हें खालीं कोष्टक दाखविलें आहे.

स्थाने—व्यय. एका. दश. नव. अष्ट. सप्त.
पापग्र.—सर्व अर्ध, तिसरा, चवथा, पाचवा, साहावा,
शुभग्र.—अर्ध चवथा, साहावा, अठवा, दहावा, बारावा,

या प्रमाणानें आयुर्दायांचे वर्षांतून, त्या त्यास्थानी असलेल्या, प्रत्येक ग्रहाचीं वर्षें कमी होतात. एकराशीस एकत्र असलेल्या ग्रहांमध्यें जो बळवान्, त्याचा त्याचे आयुष्यांतून एक भाग कमी होतो. ( असेंच सत्याचार्य यांणींही सांगितलें आहे. )

॥ वसंततिलका ॥ ४

सार्धोदितोदितनवांशहतात्समस्ताद्भागोष्टयुक्त शतसंख्यमुपैतिनाशम् ॥ क्रूरेविलग्नसहितेवि धिनात्वनेनसौम्येक्षितेदलमत:प्रलयंप्रयाति ॥

अर्थ—लग्नाचे उदयास आलेले, सर्व नवमांश राशिचक्राच्या ( दृश्यार्ध भागाचे ) उदित नवमांशांमध्यें मिळवून; त्या संख्येनें सर्व एकत्र केलेल्या आयुर्दाय वर्षांचे संख्येस गुणून ; त्या गुणाकारास १०८ चा भाग द्यावा. येतील तीं वर्षें. क्रूरग्रह लग्नीं असल्यास, त्या एकंदर वर्षसंख्येतून कमी करावीं. आणि जर त्या लग्नावर शुभग्रहाची दृष्टि असेल, तर अर्धसंख्या मात्र कमी करावी.

॥ शिखरिणी ॥ ५

समाःषष्टिर्द्विघ्नामनुजकरिणांपंचचनिशाहया
नांद्वात्रिंशत्खरकरभयोःपंचककृतिः ॥ विरू
पासाप्यायुर्वृषमहिषयोर्द्वादशशुनां स्मृतंछा
गादीनांदशकसहिताःषट्चपरमम् ॥

**अर्थ**—एकशेंवीस १२० वर्षें आणि पांच दिवस व रात्रि, इतकें परमायुष्य मनुष्य व हत्ती यांचें; अश्वाचें बत्तिस; उंट, गाढवें यांचें पंचवीस; गाई ह्मशी यांचें चोवीस; कुत्र्याचीं बारा; शेळ्या मेंढरें यांचीं सोळा; याप्रमाणें 'परमायुष्याचीं वर्षें' आहेत.

॥ पुष्पिताग्रा ॥ ६

अनिमिषपरमांशकेविलग्नेशशितनयेगविपंचव
र्गलिप्ते॥भवतिहिपरमायुषःप्रमाणंयदिसकलाः
सहिताःस्वंतुगभेषु ॥

**अर्थ**—जर लग्नीं मीनराशि शेवटच्या नवमांशीं (वर्गो-त्तम;) व बुध वृषभेस पंचवीस अंश व बाकीचे सर्व ग्रह आपल्या उच्चराशीस असतील; तर तें 'पूर्णपरमायु' होतें. असें जाणावें.

॥ शालिनी ॥ ७

आयुर्दायंविष्णुगुप्तोपिचैवंदेवस्वामीसिध्धसेनश्चक्रे॥ दो
षश्चैषांजायतेष्टावरिष्टंहित्वानायुर्विंशतेःस्यादधस्तात्॥

**अर्थ**—विष्णुगुप्त, देवस्वामी, सिद्धसेन, यांणीं हा

असा आयुर्दाय केला आहे. यामध्यें दोष आहे. आठ वर्षे अरिष्टाची टाकून, पुढच्या एकशें वीस वर्षांतही आयुष्यहीन असतात.

॥ शालिनी ॥ ८

**यस्मिन्योगेपूर्णमायुःप्रदिष्टंतस्मिन्प्रोक्तंचक्रवर्तित्वमन्यैः ॥ प्रत्यक्षोयंतेषुदोषःकरोपिजीवत्यायुःपूर्णमर्थैर्विनापि ॥**

**अर्थ**——ज्या योगावर पूर्ण परमायु सांगतात, (वर श्लो० ६) त्याजवर तर किती एक आचार्यांचे मतानें 'चक्रवर्तित्व' राजयोग असतो; परंतु कित्येक 'दरिद्रांतही पूर्णायुषी' असतात. तेव्हां हाच दोष प्रत्यक्ष त्यांमध्यें आहे.

॥ उपच्छदसिका ॥ ९

**स्वमतेनकिलाहजीवशर्माग्रहदायंपरमायुषःस्वरांशम्॥ ग्रहभुक्तनवांशतुल्यंबहुसाम्यंसमुपैतिसत्यवाक्यम् ॥**

**अर्थ**—जीव शर्मा, तर परमायुष्याच्या सप्तमांशाइतकीं प्रत्येक ग्रहांचीं आयुर्दाय वर्षें आपल्याच मतानें निश्चयेंकरून, सांगतो. (बहुसंमत नाहीं. हा त्यांतही दोष आहे.) **अनेक आचार्यांस संमत असें सत्याचार्य यांचें मतानें तर**, ग्रह जितके नवमांश; राशिवर भुक्त झाला असेल, तितक्या राशीचे अंकाइतकीं त्या ग्रहाचीं आयुर्दाय वर्षें—असें आहे.

॥ **आर्या** ॥ १०

**सत्योक्तेग्रहमिष्टंलिप्तींकृत्वाशतद्वयेनाप्तं ॥ मंडलभागविशुध्धेब्दाःस्युःशेषात्तुमासाद्याः ॥**

अर्थ—सत्याचार्य यांचे मतानें आयुर्दाय करणें असेल, तर स्पष्ट ग्रहाच्या ( अंशकळादिकांच्या ) सर्व विकळा करून, त्यांस २०० दोनशांनीं भागावें. व त्या भागाकारास बारा १२ चा भाग द्यावा. येतील तीं वर्षं; व बाकी राहील तिचे मासादिक करावें.

॥ वंशस्था ॥ ११

स्वतुंगवक्रोपगतैस्त्रिसंगुणंद्विरुत्तमस्वांशकभत्रिभागगैः ॥ इयान्विशेषस्तुभदत्तभाषितेसमानमन्यत्प्रथमेप्युदीरितम् ॥

अर्थ—सत्याचार्य यांचे मतानें; ग्रह आपल्या स्वराशीस किं०—वर्गोत्तमनवमांशीं किं०—स्वनवमांशीं किं०—स्वद्रेष्काणीं असतां; आलेल्या आयुर्दाय वर्षांची दुप्पट करावी. आणि स्वोच्चराशीस किंवा वक्र असतां; तिप्पट करावी. इतकें विशेष आहे. बाकीचें कर्तव्य ते वर सांगितलें आहे. ह्म० श्लोक २।३ यात सांगितल्यां प्रमाणें करावें.

॥ इंद्रवज्रा ॥ १२

किंत्वत्रभांशप्रतिमंददातिवीर्यान्वितारराशिसमंचहोरा॥ क्रूरोदयेचोपचयःसनात्रकार्यंचनाब्दैःप्रथमोपदिष्टैः ॥

अर्थ—लग्नाचीं वर्षं भुक्त नंवमांश अंकातुल्य घ्यावीं. ( किं० विकळादिं करून २०० नीं भागावें इ०) व लग्न बळिष्ट असेल, तर राशीच्या अंकाइतकीं वर्षं घ्यावीं.— क्रूर ग्रह लग्नीं असतां. इ०, व पूर्वी सांगितलेल्या, ग्रहांची

वर्षे इ० (श्लोक ४।१।२ यांत सांगितलेलीं) एथें घेऊ नये.

॥ इंद्रवज्रा ॥ १३

**सत्योपदेशोवरमत्रकिंतुकुर्वंत्ययोग्यंबहुवर्गिणाभिः॥
आचार्यकत्वंचबहुघ्नतायामेकंतुयत्भूरितदेवकार्यम् ॥**

**अर्थ**—सत्याचार्यांनीं सांगितलेला आयुर्दाय वर सांगितलेल्या अन्य प्रकाराहून उत्तम आहे; कारण अन्यआचार्य तर ग्रह जितके बलानीं युक्त असेल, तितके वेळा दुप्पट किंवा तिप्पट करण्यास सांगतात, (तें अयोग्य आहे,) परंतु सत्याचार्य तर त्या ठिकाणीं एकच वेळ दुप्पट किं० तिप्पट करण्यास सांगतात. तसेंच करावें. (श्लो० ११ प्र०)

॥ पुष्पिताग्रा ॥ १४

**गुरुशशिसहितेकुलीरलग्नेशशितनयेभृगुजेचकेंद्रयाते ॥ भवरिपुसहजोपगैश्वशेषैरमितमिहायुरनुक्रमाद्विनास्यात् ॥**

**अर्थ**—वर सांगितलेल्या आयुर्दायाचे अनुक्रमाहून, ही 'अपरिमित आयुष्य' ह्या योगावर जन्म झाला असतां होतें. तो योग.—गुरुचंद्र, हे कर्कराशीस लग्नीं प्राप्त असावेत, व बुध शुक्र, हे केंद्रावर असावेत. आणि बाकीचे ग्रह एकादश, षष्ठ, तृतीय, या स्थानी असावेत, ह्मणजे तो 'अपरिमितायुष्य योग' होतो (वरील क्रमाशिवाय.)

**॥ आयुर्दायाध्याय संपूर्ण ॥ ७**

---

## ॥ दशांतर्दशाध्यायः ॥ ८



### ( आयुष्यांतील सुखदु:खांचे भेद )

॥ मालिनी ॥ १

उदयरविशशांकप्राणिकेंद्रादिसंस्था:प्रथमवयसि
मध्येंत्येचदद्यु:फलानि॥नहिनफलविपाक:केंद्रसं
स्थाद्यभावेभवतिहिफलपंक्ति:पूर्वमापोक्लिमेपि ॥

**अर्थ**—लग्न, सूर्य, चंद्र, यांतून; जे बळवान् असेल. त्याचे केंद्र, पणफरादिकस्थ ग्रहांचे क्रमानें, प्रथम, मध्य, अंत्य वयांमध्यें, दशेचा फलपाक होतो. ह्मणजे लग्न जर बळवान् आहे, तर प्रथम वयामध्यें दशा बळवान् होये;—सूर्य बळवान् आहे, तर मध्य वयामध्यें ;—व चंद्र बळवान् आहे तर अंत्य वयामध्यें;—आतां या तिघांमध्यें प्रत्येकाचे पोटांत त्यांचे त्यांचे केंद्र, पणफर, आपोक्लिमस्थ ग्रहांच्या दशा अनुक्रमानें घ्याव्या. जर केंद्रीं ग्रहांचा अभाव असेल तर; पणफर—व तेथेंही अभाव असेल तर ; आपोक्लिम—या क्रमानें दशाक्रम बसवावा—तसेंच लग्न, सूर्य, चंद्र यांत, केंद्रींचे कोणी बळवान् नसतील, तर—पणफरस्थच प्रथम वयामध्ये फलदायक. तेही नसल्यास,—आपोक्लिमस्थ फल देणारे होतील.

॥ इंद्रवज्रा ॥ २

आयु:कृतंयेनहियत्तदेवकल्प्यादशासाप्रबलस्यपूर्वम् ॥
साम्येवहूनांबहुवर्षदस्यतेषांचसाम्येप्रथमोदितस्य ॥

अर्थ—ग्रहांचे आयुर्दाय केलेले असतील, त्यांत जो बळीष्ट असेल, त्याची दशा प्रथम (वर सांगितल्याप्रमाणें तींच वर्षे त्याच्या दशेस्तव ) घ्यावीं. पुष्कळ ग्रह एकत्र असतील, तर ज्याचीं अधिक वर्षे तो प्रथम घ्यावा. त्यांतही सारिखे असतील; तर जो प्रथम उदयास आला असेल, तो पहिल्यानें घ्यावा.

॥ वसंततिलका ॥ ३

एकर्क्षगोर्ध्वमपहृत्यददातिुस्वंत्र्यंशत्रिकोणगृह
गःस्मरगःस्वरांशं॥पादंफलस्यचतुरस्रगतःसहो
रास्त्वेवंपरस्परगताःपरिपाचयंति ॥

अर्थ—अंतर्दशेस्तव, ग्रह आपणाशीं युक्त असलेल्या ग्रहास आपले वर्षांतून, निमें वर्षे काढून देतो; व आपणापासून नव, पंचम असलेल्यास $\frac{1}{3}$ देतो, व सप्तम स्थानीं असलेल्यास $\frac{1}{7}$ देतो; व चतुर्थ, अष्टम स्थानीं असलेल्यास $\frac{1}{4}$ देतो; लग्न दशेची वर्षे पण याच क्रमानें जाणावीं.—

॥ इंद्रवज्रा ॥ ४

स्थानान्यथैतानिसवर्णयित्वासर्वाण्यधच्छेदविवर्जिता
नि॥दशाब्दपिंडेगुणकायथांशंच्छेदस्तदैक्येनदशाप्रभेदः।

अर्थ—अंतर्दशेच्या ग्रहांची स्थानें पाहून, त्याप्रमाणे त्यांचे अपूर्णांक रूपानें अंशच्छेद मांडून, ($\frac{1}{2}$, $\frac{1}{3}$, $\frac{1}{4}$, $\frac{1}{7}$ इ०) त्या सर्वांस समच्छेद रूप द्यावें. नंतर छेद पुसून टाकावे; व ते अंश गुणक समजून, त्या ग्रहांचे दशाब्द पिंडास (वर्षांस) गुणून छेदानी भागावें. येतील ते दशाभेद ( अंतर्दशा ) जाणावें.

॥ वैतालिका ॥ ५

सम्यग्बलिनःस्वतुंगभागेसंपूर्णाबलवर्जितस्यरिक्ता ॥
नीचांशगतस्यशत्रुभागेज्ञेयानिष्टफलादशाप्रसूतौ ॥

अर्थ––जन्मकाळिक ग्रह उत्तम बळी, स्वोच्चांशीं, असतां त्या दशेस "संपूर्णा दशा" ह्मणावी.–बलहीन, नीचांशी, शत्रु नवमांशीं, असतां, ती "रिक्तादशा" अनिष्ट फळ देणारी. असें जाणावें.

॥ इंद्रवज्रा ॥ ६

भ्रष्टस्यतुंगादवरोहिसंज्ञामध्याभवेत्सासुहृदुच्चभागे ॥
आरोहिणीनिम्नपरिच्युतस्यनीचारिभांशेष्वधमाभवेत्सा

अर्थ––परमोच्च अंशापासून पुढें गेलेल्या ग्रहांचे दशेस 'अवरोही',–मित्र नवमांशीं, उच्चांशीं, अशांचे दशेस 'मध्या'–परम नीचांशा पासून पुढें गेलेल्याचे दशेस 'आरोहिणी'––नीचांशीं, शत्रु नवांशी, च्या दशेस 'अधमा'. असें ह्मणावें.

॥ उपजातिका ॥ ७

नीचारिभांशेसमवस्थितस्यशस्तेगृहेमिश्रफलाप्रदिष्टा।
संज्ञानुरूपाणिफलान्यथैषांदशासुवक्ष्यामियथोपयोगम्

अर्थ––नीचांशीं, शत्रु नवांशीं, जरी ग्रह आहे, आणि तो जर स्थानबळ पावलाअसेल ; तर ती दशा 'मिश्रा' –याप्रकारें आपल्या नावाचे गुणाप्रमाणे तीती दशा फलदायक होत्ये. त्यांची फळें ग्रहांच्या दशा फळांमध्यें यथोप योग्य सांगेन.

॥ वैतालिका ॥ ८

उभयेधममध्यपूजिताद्रेष्काणैश्वरभेषुचोत्क्रमात् ॥
अशुभेष्टसमाःस्थिरेक्रमाद्धोरायाःपरिकल्पितादशा॥

अर्थ—लग्नाचीं दशा अशी कल्पीलेली आहे. द्वि-स्वभाव लग्नाचे प्रथम द्रेष्काणास ‘अधमा’—दुसऱ्या द्रेका० ‘मध्यमा’ —तिसऱ्या द्रेष्काणास ‘पूजिता’—चर लग्नाचे द्रेष्काणाविषयीं याहून, उलटा क्रम जाणावा.—स्थिर लग्नाविषयीं पहिल्या द्रे० स ‘अशुभां’—दुसऱ्यास ‘इष्टा’—तीसऱ्यास—‘समा’ असें जाणावें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ९

एकंद्वौनवविंशतिर्धृतिकृतीपंचाशदेषांक्रमाच्चंद्रारेंदु
जशुक्रजीवदिनकृद्दैवाकरीणांसमाः ॥ स्वैःस्वैःपुष्ट
फलानिसर्गजनितैःपंक्तिर्दशायाःक्रमादंतेलग्नदशा
शुभेतियवनानेच्छांतिकेचित्तथा॥

अर्थ——ग्रहांच्या नैसर्गिकदशां ( स्वाभाविकदशा) चीं वर्षें; जन्मल्या पासून, प्रथम चंद्र १ वर्ष, मंगळ २, बुध ९, शुक्र २०, गुरु १८, सूर्य २०, शनी ५० मिळून १२० वर्षें. याक्रमानें ग्रह आपआपल्या बळाप्रमाणें स्वदशेमध्यें पूर्ण फळ देतात. यांच्या शेवटीं लग्नाची दशा शुभफळदायक, असें यवनाचार्य मतानें आहे. परंतू तेकोणास मान्य नाही.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १०

पाकस्वामिनिलग्नगेसुहृद्दिवावर्गेस्यसौम्येपिवाप्रार
ब्धाशुभददशात्रिदशषड्लाभेषुवापाकपे ॥ मित्रो
च्चोपचयत्रिकोणमदनेपाकेश्वरस्यस्थितश्चंद्रः सत्फ
लबोधनानिकुरुतेपापानिचातोन्यथा ॥

**अर्थ**—दशास्वामी (ज्याची दशा तो) दशा प्रवेशवेळेच्या लग्नकुंडलींत. लग्नीं, मित्रगृहीं, सौम्यगृहीं, स्ववर्गीं असा जर असेल; तर ती दशाशुभफलदायक होईल.— किंवा (तीन, दाहा, साहा, अकरा,) या उपचय स्थानीं दशास्वामी असेल तरी शुभफल देईल;—याच प्रकारे त्या कुंडलीचा चंद्र; मित्रगृहीं, उच्च, उपचयस्थानीं, त्रिकोणी, सप्तमस्थ, यांतून एक प्रकारचा जरी असेल, तरी ती दशा उत्तम फळप्राप्ति करील. जर तो चंद्र पाप, नीच, असा अन्यप्रकारचा असेल, 'तर दशा निष्फळ' जाणावी.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ११

प्रारब्धाहिमगोदशास्वगृहगेमानार्थसौख्यावहा
कौजेदूषयतिस्त्रियंबुधगृहेविद्यासुहृद्वित्तदा ॥
दुर्गारण्यपथालयेकृषिकरीसिंहेसितर्क्षेन्नदा
कुस्त्रीदामृगकुंभयोर्गुरुगृहेमानार्थसौख्यावहा ॥

**अर्थ**—दशा प्रवेशकाळींचा चंद्र स्वगृहीं असल्यास; मान, धन, सौख्य, देणारी ती दशा होईल;—मंगळाचे गृही जर चंद्र असेल तर स्त्रीस दूषणदायक;—बुधगृही असेल तर विद्या, मित्र, धन दायक ;—सिंहेस अ-

सेल तर दुर्ग, अरण्य, मार्ग, गृह, या स्थळीं कृषिकर्म करवील.—शुक्रगृहीं असे॰ उत्तम अन्नांची प्राप्ति;—शनिगृहीं अ॰ कुस्त्रीप्राप्ति;—आणि गुरूचे गृहीं असेल तर सन्मान, अर्थ, सौख्यें; यांची प्राप्ति. असें जाणावें.

शार्दूलविक्रीडित ॥ १२

सौर्यांस्वंनखदंतचर्मकनकक्रौर्याध्वभूपाहवैस्तै
क्ष्ण्यंधैर्यमजस्त्रमुद्यमरतिःख्यातिःप्रतापोन्नतिः॥
भार्यापुत्रधनारिशस्त्रहुतभुग्भूपोद्भवाव्यापदस्त्या
गीपापरतिःस्वभृत्यकलहोत्ट्टत्क्रोडपीडामयाः ॥

**अर्थ—सूर्यदशाफल**—सूर्याचे **उत्तम दशेमध्यें**; नख (वाघनखादि), दंत (हास्तिदंतादि), चर्म (मृग व्याघ्र चर्मादि), सुवर्ण, क्रूरता, मार्ग, राजा, युद्ध, यांपासून धनप्राप्ति; आणि उग्रपणा, धैर्य, निरंतर उद्योगीपणा, विख्याति, प्रतापेंकरून श्रेष्ठत्व; इत्यादिक श्रेष्ठ फळें प्राप्त होतात.—सूर्याचे **अनिष्ट दशेमध्यें**—स्त्री, पुत्र, धन, शत्रु, शस्त्र, अग्नि, राजा, यांपासून पीडा प्राप्त; त्यागीपणा (उदासी), पापबुद्धि, सेवकांशीं कलह, छातीस [illegible]दरास पीडा, व रोगवृद्धि अशीं वाईट फळें होतात.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १३

इंदोःप्राप्यदशाफलानिलभतेमंत्रद्विजात्युद्भवानि
क्षुक्षीरविकारवस्त्रकुसुमक्रीडातिलान्नश्रमैः ॥नि
द्रालस्यमृदुद्विजामररतिःस्त्रीजन्ममेधाविताकीर्त्य
र्थोपचयक्षयौचबलिभिर्वैरंस्वपक्षेणच ॥

**अर्थ—चंद्रदशाफल;** चंद्राची शुभ दशा प्राप्त असतां ;—ब्राह्मणक्षत्रियद्वारा मंत्रप्राप्ति ( गुप्त मसलत), ऊंस, व दूध यांचेपासून झालेल्या पदार्थांनी केलेलीं पक्वान्नें इत्यादिक, वस्त्रें, पुष्पें, क्रीडा, तिळांचे पदार्थ, अन्नें, श्रम यांपासून शुभफल प्राप्ति;—**अशुभदशेंतील फळें;** निद्रा, आलस्य, यांचे ठायीं आसक्ति; क्षमाशील, देवब्राह्मणभक्ति, कन्याजन्म; बुद्धि, कीर्ति, वृद्धि, यांची क्षयवृद्धि; आणि बळिष्ठाशीं व स्वपक्षाशीं वैर होतें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १४

**भौमस्यारिविमर्दभूपसहजक्षित्याविकाजैर्धनंप्र द्वेषःसुतमित्रदारसहजैर्विद्वद्गुरुद्वेष्टिता ॥ तृष्णा सृक्ज्वरपित्तभंगजनितारोगाःपरस्त्रीकृताः प्री तिःपापरतैरधर्मनिरतिःपारुष्यतैक्ष्ण्यानिच ।**

**अर्थ—मंगळदशाफल**—शत्रूंचा नाश ; भूपति, बंधु, भूमि, ऊर्णा, यांहीं करून धनप्राप्ति ; हें मंगळाची शुभ दशा प्राप्त असतां होतें. **अशुभ दशेचीं फळें.**—सुत, मित्र, स्त्री, बंधु, विद्वान्, गुरु यांचे ठिकाणीं द्वेष; व तृष्णा, रक्त, ज्वर, पित्त, मोडणें ( अ[illegible]यव) परस्त्री, इत्यादि कारणांनी रोगप्राप्ति;—व पापिष्ट [illegible]नांशीं प्रीति, अधर्माची प्रवृत्ति, कठोर भाषण, उग्र स्वभाव इत्यादिक अनिष्ट फळें होतात.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १५

**बौध्यांदौत्यसुहृद्गुरुद्विजधनंविद्वत्प्रशंसायशोयु क्तिद्रव्यसुवर्णवेसरमहीसौभाग्यसौख्याप्तयः॥**

हास्योपासनकौशलंमतिचयोधर्मक्रियासिद्धयः
पारुष्यंश्रमबंधमानसशुचःपीडाचधातुत्रयात् ॥

अर्थ—बुधदशाफळ—दूतपणा (वकिली, मध्यस्थी), मित्र, गुरु, ब्राह्मण व क्षत्रिय यांपासून धनप्राप्ति; विद्वानापासून प्रशंसा; यश, युक्ति, द्रव्य, सुवर्ण, अश्व, भूमि, सुभाग्य, सौख्य, यांचे लाभ; हास्य, उपासन (खुशामत, आर्जव), कौशल्य, बुद्धिवृद्धि, धर्मकार्यें इ० ची सिद्धि; अशीं शुभ दशेंत इष्ट फळें होतात. अशुभ दशेंत.—कठोर भाषण, श्रम, बंधन, मानसीव्यथा, त्रिदोषपीडा (वात पित्त कफादि); हीं फळें होतात.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १६

जैव्यांमानगुणोदयोमतिचयःकांतिःप्रतापोन्नति
र्माहात्म्योद्यममंत्रनीतिनृपतिस्वाध्यायमंत्रैर्धनम्॥
हेमाश्वात्मजकुंजरांबरचयःप्रीतिश्चसद्भूमिपैःसू
क्ष्मोहागहनश्रमःश्रवणरुग्वैरंविधर्माश्रितैः ॥

अर्थ—गुरुदशाफळ–सन्मान व गुणांचा उदय, बुद्धि, वृद्धि, कांति, प्रतापें करून वरचढपणा, माहात्म्य (...ता), उद्यम, मंत्रनीति (राजनीति), नृपति, स्वाध्याय (वेदपठण मंत्र जपादि), यांहींकरून धनप्राप्ति; सुवर्ण, अश्व, पुत्र, हत्ती, वस्त्रें यांची बहुत प्राप्ति; भूमिपतीशीं स्नेहप्राप्ति, याप्रकारें शुभदशेचीं फळें होतात.—अशुभदशेचीं फळें;—सूक्ष्म तर्काविषयीं असाध्य श्रम, कर्णरोग, धर्महीनांशीं द्वेष, अशीं फळें होतात.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १७

**शौक्रयांगीतरतिप्रमोदसुरभिद्रव्यान्नपानांबर**
**स्त्रीरत्नद्युतिमन्मथोपकरणज्ञानेष्टमित्रागमाः॥**
**कौशल्यंक्रयविक्रयेकृषिनिधिप्राप्तिर्धनस्यागमो**
**वृंदोर्वीशनिषादधर्मरहितैर्वैरंशुचःस्नेहतः ॥**

**अर्थ—शुक्रदशाफळ**—गीत, रति, आनंद, सुरभि द्रव्यें, (गाईचे दुग्धादि पदार्थ, सुगंधि द्रव्यें, सुवर्णद्रव्यें), अन्नपान, वस्त्रें, स्त्री, रत्नें, कांति, रतिसुखाचीं साहित्यें, ज्ञान, इष्ट, मित्र, यांची प्राप्ति; क्रयविक्रय करण्यांत कुशलता, कृषि (शेतकी), निधि (गुप्तधन), धन यांचे लाभ; अशीं शुभ दशेंत फळें होतात;—**अशुभ दशेचीं फळें**—अनेक राजे, अनेक कनिष्ठ जातीय लोक, धर्मरहित, यांशीं वैर आणि स्नेहापासून शोकप्राप्ति, अशीं फळें होतात.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १८

**सौरिंप्राप्यखरोष्ट्रपक्षिमहिषीवृद्धांगनावाप्तयः**
**श्रेणीग्रामपुराधिकारजनितापूजाकुधान्यागमः॥**
**श्लेष्मेर्ष्यानिलकोपमोहमलिनव्यापत्तितंद्रा—**
**न्भृत्यापत्यकलत्रभर्त्सनमपिप्राप्नोतिचव्यंगताम्॥**

**अर्थ—शनिदशाफळ**—गाढवें, उंटें, पक्षी, म्हशी, वृद्ध स्त्रिया, यांची प्राप्ति; कारखाने किं० ग्राम, पुर यांची माळिका (महाल, परगणे, तालुके इ०) यांच्या अधिकारावर सन्मानित;—कुधान्यांची प्राप्ति; (बाजरी, कोद्रु, मकई

इ०) अशीं फळें शुभ दशेंत होतात.— अशुभ दशेचीं फळें;—कफविकार, ईर्ष्या, वातविकार, कोप, चित्तभ्रम, मलिनता, सुस्ती, खेद, यांहींकरून श्रमित (दुःखी), सेवकजन, पुत्र, स्त्री यांजकडून अनादर आणि अवयवभंग होणें; अशीं वाईट फळें होतात.

॥ उपजातिका ॥ १९

दशासुशस्तासुशुभानिकुर्वंत्यनिष्टसंज्ञास्वशु
भानिचैवम् ॥ मिश्रासुमिश्राणिदशाफला
निहोराफलंलग्नपतेःसमानम् ॥

अर्थ—दशेच्या ठायीं शुभग्रहाची दशा शुभ फळ देते, व अनिष्ट ग्रहांच्या दशा अशुभ फळें देतात, व मिश्र ग्रहांच्या दशा मिश्र फळें देतात. लग्नदशा लग्नपतीच्या फळाप्रमाणें जाणावी.

॥ शालिनी ॥ २०

संज्ञाध्यायेयस्ययत्द्रव्यमुक्तंकर्माजीवोयश्चयं
स्योपदिष्टः॥भावस्थानालोकयोगोद्भवंचतत्त
तसर्वंतस्ययोज्यं दशायाम् ॥

अर्थ—संज्ञाध्यायामध्यें (अ० २) ज्या ग्रहांचे जे पदार्थ सांगितले आहेत ते, व कर्माजीवाध्यायामध्यें जें सांगणें आहे तें; व भावस्थानांचीं, दृष्टीचीं, योगोद्भव (सांगणें आहेत) इत्यादिक फळें त्यांच्या त्यांच्या त्या दशेंत योजावीं.

॥ इंद्रवज्रा ॥ २१

छायांमहाभूतकृतांचसर्वेभिव्यंजयंतिस्वदशाम
वाप्य ॥ क्ष्म्यंबुग्नियाय्वंबरजान्गुणांश्चनासास्यदृ
क्त्वक्श्रवणानुमेयान् ॥

**अर्थ**—ग्रहांच्या दशा, छायारूपानें (देहस्थितीनें), पंच महाभूतें ( पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ) स्पष्ट दर्शवितात.—पृथ्वीचा गुण गंध नाकाचेठायीं; जळाचा गुण रस मुखांत; तेजाचा गु० रूप नेत्रांत; वायूचा गुण स्पर्श त्वचेवर; आकाशाचा गु० शब्द, कर्णास; याप्रकारें, ग्रहांचीं तत्वें ( स्वस्वदशेंत ) नेहमीं अनुभव देत असतात. (अ० २ श्लो० ६ पहा.)

॥ मालिनी ॥ २२

शुभफलददशायांतादृगेवांतरात्माबहुजनयतिपुं
सांसौख्यमर्थागमंच ॥ कथितफलविपाकैस्तर्कयेद्
वर्तमानांपरिणमतिफलोक्तिःस्वप्नचिंतास्ववीर्यैः॥

**अर्थ**—शुभफळाच्या दशेमध्यें **अंतरात्मा** तसाच बहुत प्रकारचीं सौख्यें व अर्थप्राप्तीतें उत्पादन करितो. यास्तव वर सांगितलेल्या फळ विपाकांनीं चालू असले ल्या दशेच्या ठायीं सांगितलेलीं फळें परिणाम पावतात. तो ग्रह स्वबळेंकरून, स्वप्नांत व मनोरथामध्यें अनुभव देत असतो. यास्तव तर्कानें ग्रहाची चालती दशा ओ- ळखून काढावी.

॥ वसंततिलका ॥ २३

एकग्रहस्यसदृशेफलयोर्विरोधेनाशंवदेद्यदधिकं
परिपच्यतेतत् ॥ नान्योग्रहःसदृशमन्यफलंहि
नास्तिस्वांस्वांदशामुपगताःस्वफलप्रदाःस्युः॥

अर्थ——एका ग्रहाचीं दोन फळें एकमेकांस विरुद्ध असतील तर त्यांत जें अधिक फळ तें दुसऱ्याचा नाश करितें–दोन ग्रहांचीं फळें परस्पर विरुद्ध असतां, ते फळांचा नाश न करितां, आपआपल्या दशेमध्यें तीं फळें प्राप्त करितात, असें जाणावें.

॥ दशांतर्दशाध्यायसंपूर्ण ॥ ८

---

## ॥ अष्टकवर्गाध्यायः ॥ ९

( लग्न व ग्रहांची परस्परांपासून शुभाशुभ स्थानें )

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १

स्वादर्कःप्रथमायबंधुनिधनद्व्याज्ञातपोद्यूनगोत्र
क्रात्स्वादिवतद्वदेवरविजाच्छुक्रात्स्मरांत्यारिषु॥
जीवात्धर्मसुतायशत्रुषुदशव्यायारिगःशीतगो
श्चैतेष्वांत्यतपःसुतेषुचबुधाल्लग्नात्सबंध्वंत्यगः॥

( ह्या अष्टक वर्गांची कोष्टकानें उपयोगास्तव स्पष्टता केली आहे, त्यांत शुभ ह्म० अकाररेषा व अशुभ ह्म० शून्य असें जाणावें. )

अर्थ—सूर्याष्टकवर्ग कोष्टक.

| | प्र. | द्वि. | तृ. | च. | पं. | ष. | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सू. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| चं. | ० | ० | ० | ० | ० | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० |
| मं. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| बु. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ |
| गु. | ० | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ० | ऽ | ० |
| शु. | ० | ० | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ |
| श. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| ल. | ० | ऽ | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ऽ |

॥ शार्दूलविक्रीडित ॥ २

लग्नात्षट्त्रिदशायगःसधनधीधर्मेषुचाराच्छशीस्वा
त्सास्तादिषुसाष्टसप्तसुरवेःषट्त्र्यायधीस्थोयमात्॥
धीत्र्यायाष्टमकंटकेषुशशिजाज्जीवाद्व्ययायाष्टगः
केंद्रस्थश्चसितात्तुधर्मसुखधीत्र्यायास्पदानंगगः ॥

अर्थ.—चंद्राष्टकवर्ग कोष्टक.

| | प्र. | द्वि. | तृ. | च. | पं. | ष. | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सू०. | ० | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |
| च. | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० |
| मं. | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ० |
| बु. | ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ |
| गु. | ऽ | ० | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |
| शु. | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ | ० |
| श. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ | ० |
| ल. | ० | ० | ऽ | ० | ० | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० |

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ३

वक्रस्तूपचयेष्विनात्सतनयेष्वाद्यादिकेषूदयाच्चंद्राद्दि
ग्विफलेषुकेंद्रनिधनप्राप्त्यर्थगःस्याच्छुभः॥धर्माया

ष्टमकेंद्रगोर्कतनयाज्ज्ञात्षट्त्रिधीलाभगःशुक्रात्षड्
व्ययलाभमृत्युषुगुरोःकर्मांत्यलाभारिषु ॥

अर्थ–मंगळाष्टकवर्गकोष्टक.

| | प्र. | द्वि. | तृ. | च. | पं. | ष- | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सू. पा. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० |
| च. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ | ० |
| मं. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |
| ब. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ | ० |
| गु. | ० | ० | ० | ० | ० | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ऽ |
| शु. | ० | ० | ० | ० | ० | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ |
| श. | ऽ | ० | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| ल. | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० |

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ४

द्व्याद्यायाष्टतपःसुखेषुभृगुजात्सव्यात्मजेष्विंदुजः
साज्ञास्तेषुयमारयोर्व्ययरिपुप्राप्त्यष्टगोवाक्पतेः ॥
धर्मायारिसुतव्ययेषुसवितुःस्वात्साद्यकर्मात्रिगः
ष[illegible]स्वायाष्टसुखास्पदेषुहिमगोःसाद्येषुलग्नाच्छुभः ॥

अर्थ–[illegible]र्प. ष[illegible]र्गकोष्टक.

| | प्र. | द्वि. | तृ. | ऽ | ० | ० | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सू. पा. | ० | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ |
| चं. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |
| मं. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| बु. | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ |
| गु. | ० | ० | ० | ० | ० | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ |
| शु. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ० |
| श. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| ल. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ५

दिक्स्वाद्याष्टमदायबंधुपुकुजात्स्वात्सत्रिकेष्वंगिराः
सूर्यात्सत्रिनवेषुधीस्वनवदिग्लाभारिगोभार्गवात्॥
जायायार्थनवात्मजेषुहिमगोर्मंदात्त्रिषट्धीव्यये
दिग्धीषट्स्वसुखायपूर्वनवगोज्ञात्सस्मरश्चोदयात् ॥

अर्थ—गुरोरष्टकवर्गकोष्टक.

| | प्र. | द्वि. | तृ. | च, | पं. | ष. | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सू. पा. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | [illegible] | [illegible] | ० |
| चं. | ० | ऽ | ० | ० | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ० | ऽ | ० |
| मं. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |
| बु. | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ० |
| गु. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |
| शु. | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ० |
| श. | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ० | ० | ० |
| ल. | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ<br>० | ०<br>ऽ | ऽ<br>ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ | ० |

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ६

लग्नादासुतलाभरंध्रनवगःसांत्यःशशांकात्सितःस्वा
त्साज्ञेषुसुखत्रिधीनवदशाच्छिद्राप्तिगःसूर्यजात्॥ रं
ध्रायव्ययगोरवेर्नवदशप्राप्त्यष्टधीस्थोगुरोर्ज्ञात्धीत्र्या
यनवारिगस्त्रिनवषट्पुत्रायसांत्यःकुजात् ॥

## अर्थ—शुक्राष्टकवर्गकोष्टक.

| | प्र. | द्वि. | तृ. | चं. | पं. | ष. | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सू. पा. | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ |
| चं. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ |
| म. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ |
| बु. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ० | ऽ | ० |
| गु. | ० | ० | ० | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| शु. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| श. | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० |
| ल. | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ० |

श. ऽ ऽ

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ७

ल. ऽ

[illegible]त्त्रिसुतायशत्रुषुशुभ:साज्ञांत्यगोभूमिजा
त्केंद्रायाष्टधनेष्विनादुपचयेष्वाद्येसुखेचोदयात् ॥
धर्मायारिदशांत्यमृत्युषुबुधाच्चंद्रात्त्रिषड्लाभग:
षष्ठायांत्यगत:सितात्सुरगुरो:प्राप्त्यंत्यधीशत्रुषु ॥

## अर्थ—शन्यष्टकवर्ग कोष्टक.

| | प्र. | द्वि. | तृ, | च. | पं. | ष. | स. | अ. | न. | द. | ए. | द्वा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सू.पा. | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ऽ | ० |
| चं. | ० | ० | ऽ | ० | ० | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ | ० |
| मं. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ऽ |
| बु. | ० | ० | ० | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ऽ | ऽ | ऽ |
| गु. | ० | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ | ऽ |
| शु. | ० | ऽ | ० | ० | ० | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ | ऽ |
| श. | ० | ० | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ० | ० | ० | ऽ | ० |
| ल. | ऽ | ० | ऽ | ऽ | ० | ऽ | ० | ० | ० | ऽ | ऽ | ० |

॥ मालिनी ॥ ८

इतिनिगदितमिष्टंनेष्टमन्यद्विशेषादधिकफलविपाकं ज न्मभात्तत्रदद्युः ॥ उपचयगृहमित्रस्वोच्चगैःपुष्टमिष्टं त्वपचयगृहनीचारातिगैर्नेष्टसंपत् ॥

**अर्थ**—या प्रकारेंकरून वर (श्लोकांत) सांगितलेलीं स्थानें इष्ट व याहून अन्य ते अनिष्ट या दोहोंमध्यें जें विशेष तें फळ प्राप्त होतें. हे जन्मकाळींच्या लग्नावरून (अष्टवर्ग) उत्पन्न करावे. उपचयस्थानस्थित, (३, ६, १०, ११), मित्रगृहीं, स्वगृहीं, उच्चगृहीं, या स्थानचे ग्रह पूर्ण इष्ट फळ देतात. व शत्रुगृहीं, नीचगृहीं, अपचयस्थानींचे ग्रह नेष्ट फळ देतात, असें जाणावें.

॥ अष्टकवर्गाध्याय संपूर्ण ॥ ९

---

## ॥ कर्माजीवाध्यायः ॥ १०

( धंदारोजगार )

॥ प्रहर्षिणी ॥ १

अर्थाप्तिःपितृपितृपत्निशत्रुमित्रभ्रातृस्त्रीभृतक जनाद्दिवाकराद्यैः ॥ होरेंद्वोर्दशमगतैर्विकल्प नीयाभेंद्वर्कास्पदपतिगांशनाथवृत्त्या ॥

**अर्थ**—जन्मकाळीं लग्न किंवा चंद्र यांपासून, दशमस्थानीं जो ग्रह असेल त्यासारिख्या जनापासून अर्थ-

प्राप्ति जाणावी. ती अशी,–सूर्य दशमस्थानीं असतां 'पित्यापासून;'–चंद्र दश० असतां मातेपासून;–मंगळ द० स्थानीं असतां शत्रूपासून;–बुध द० असतां मित्रापासून;–गुरु द० असतां बंधूपासून;–शुक्र द० असतां स्त्रीपासून;–शनि द० असतां सेवकांपासून;– इत्यादि जनांपासून, अर्थप्राप्ति होते. –लग्न, चंद्र, सूर्य, यांजपासून दशमस्थानीं जो राशि त्याचा स्वामी ज्या नवमांशीं असेल; त्या नवमांश स्वामीचे संबंधीचे पदार्थापासून उपजीविका ( धंदा रोजगार ) चालेल. त्या नवमांशांचा विस्तार खालीं आहे.

॥ प्रहर्षिणी ॥ २

**अर्कांशेतृणकनकोर्णभेषजाद्यैश्चंद्रांशेकृषिजल**
**जांगनाश्रयाच्च॥ धात्वग्निप्रहरणसाहसैःकुजां**
**शेसौम्यांशेलिपिगणितादिकाव्यशिल्पैः ॥**

**अर्थ**—तो जर सूर्याचा नवमांश असेल तर; तृणसंबंधी, सुवर्णसंबंधी, उर्णासंबंधी, औषधादिकसंबंधी, जे पदार्थ यांहींकरून उपजीविका चालेल;–चंद्राचा नवमांश असला तर; कृषीचे (शेतकीचे) संबंधानें, जलजांच्या ( शंख, मौक्तिक प्रवालांच्या ) संबंधानें, स्त्रियांचे संबंधानें उपजीवन होईल;–मंगळाचा नवमांश असतां; धातुसंबंधी, अग्निसंबंधी, शस्त्रसंबंधी, साहसादिकसंबंधी पदार्थांनीं उपजीविका प्राप्त;–बुध नवमांश असतां; लिपिसंबंधानें, गणितसंबंधानें, काव्यसंबंधानें, शिल्पसंबंधानें इ० संबंधानें० उपजीवन होईल.–

॥ प्रहर्षिणी ॥ ३

जीवांशेद्विजविबुधाकरादिधर्मैःकाव्यांशेमणि
रजतादिगोमहिष्यैः ॥ सौरांशेश्रमवधभारनी
चशिल्पैःकर्मेशाध्युषितनवांशकर्मसिद्धिः ॥

**अर्थ**—तो जर गुरूचा नवमांश असेल तर; द्विज (ब्राह्मण, क्षत्रिय,) विबुध (देव, पंडित), आकर (रत्नादिकांच्या खाणी), धर्म (यज्ञ, दान, उपासनादि) यांच्या संबंधेंकरून उपजीवन होईल;—शुक्र नवमांश असतां, मणि (हिरे, माणकें, पाचादि), रूप्यादि (त्याचे व इतर धातूचे पदार्थ), गायी, ह्मशी, इत्यादिक संबंधानें, उपजीवन;—शनीचा नवमांश असतां; श्रमसंबंधानें, वधसंबंधानें, भारसंबंधानें, नीच शिल्पसंबंधानें, इत्यादिकांपासून उपजीविका प्राप्त होईल;—आणि लग्नापासून दशम स्थानस्वामी ज्या नवमांशीं असेल त्या नवमांशाचा जो स्वामी त्याचे संबंधी ( वर सांगितलेल्या ) पदार्थांचेच कर्मानें (धंद्यानें) सिद्धि प्राप्त होते.

॥ प्रहर्षिणी ॥ ४

मित्रारिस्वगृहगतैर्ग्रहैस्ततोर्थांतुंगस्थेबलिनिच
भास्करेस्ववीर्यात् ॥ आयस्थैरुदयधनाश्रितै
श्चसौम्यैःसंचिंत्यंबलसहितैरनेकधास्वम् ॥

**अर्थ**—वर सांगितलेले ग्रह ( नवमांश स्वामी इ.) जर मित्रगृहीं असले तर 'मित्रसंबंधाने' अर्थप्राप्ति ; शत्रुगृहीं असतां, 'शत्रुसंबंधाने' अर्थप्राप्ति ; स्वगृहीं असतां

'स्वगृह' संबंधानेंच अर्थप्राप्ति;—आणि लाभ, धन, लग्न या स्थानीं शुभ ग्रह बलयुक्त असतील तर "अनेक प्रकारानीं धनप्राप्ति" असें जाणावें.

॥ कर्माजीवाध्यायसंपूर्ण ॥ १०

## ॥ राजयोगाध्यायः ॥ ११

### ( श्रेष्ठपदाधिकार मिळणें )

॥ वैतालिक ॥ १

प्राहुर्यवनाःस्वतुंगगैःक्रूरैः क्रूरमतिर्महिपतिः ॥
क्रूरैस्तुनजीवशर्मणःपक्षेक्षित्यधिपतिःप्रजायते ॥

अर्थ—यवनाचार्यांचे मतानें क्रूर ग्रह स्वोच्चस्थ असतां, तो क्रूर महीपति होतो. परंतु जीवशर्मांचे मतानें तर तो क्षित्यधिपति ( राजतुल्य धनवान् ) होतो.

॥ वसंततिलका ॥ २

वक्रार्कजार्कगुरुभिःसकलैस्त्रिभिश्चस्वोच्चेषुषो
डशनृपाःकथितैकलग्ने ॥ द्व्येकाश्रितेषुचतथैक
तमेविलग्नेस्वक्षेत्रगेशशिनिषोडशभूमिपाःस्युः ॥

अर्थ—जन्मकाळीं स्वोच्चस्थ असे मंगळ, शनि, सूर्य, गुरु, या ग्रहांमध्यें एक लग्नीं व बाकीचे तीन अन्यस्थानीं

असतील तर हे चार ४ योग, असेच या चार ग्रहांतून तीन स्वोच्चस्थ असतां एक लग्नीं व दोन अन्यस्थानीं असतील तर हे बारा १२ योग मिळून "सोळा १६ प्रकारचे राजयोग" सांगितलेले आहेत.—आणि या वरच्या चार ग्रहांतून, दोन ग्रह स्वोच्चीं असून एक लग्नीं व एक अन्यत्र; व स्वगृहींचा चंद्र कोठें तरी असेल तर हे बारा योग व एकच ग्रह स्वोच्चस्थ असा लग्नीं, व चंद्र स्वगृहींचा असेल, तर हे चार योग मिळून हे दुसरे "सोळा १६ प्रकारचे राजयोग" सांगितले आहेत.

॥ अनुष्टुप् ॥ ३

**वर्गोत्तमगतेलग्नेचंद्रेवाचंद्रवर्जितैः ॥**

**चतुराद्यैर्ग्रहैर्दृष्टेनृपाद्वाविंशतिःस्मृताः ॥**

**अर्थ**—लग्न किंवा चंद्र हे वर्गोत्तमींचे असून (अ० १) श्लो० ४) त्यांवर चार ग्रहांच्या दृष्टि असतां पंधरा प्रकारचे योग होतात; व पांच ग्रहांच्या दृष्टीनें साहा प्रकारचे व साहा ग्रहांच्या दृष्टीनें एक मिळून "बाविस २२ प्रकारचे नृपयोग" सांगितले आहेत.

॥ शिखरिणी ॥ ४

**यमेकुंभेर्केऽजेगविशशिनितैरेवतनुगैर्नृयुक्सिंहालिस्थैः शशिजगुरुवक्रैर्नृपतयः॥ यमेंदूतुंगेंगेसवितृशशिजौ षष्ठभवनेतुलाजेंदुक्षेत्रैःससितकुजजीवैश्चनरपौ ॥**

**अर्थ**—कुंभेस शनि, मेषेस सूर्य, वृषभेस चंद्र, अशा तीन ग्रहांतून एक लग्नीं असावा; व मिथुनेस बुध, सिंहेस

गुरु, वृश्चिकेस मंगळ, या प्रकारचे ग्रह असतां, ह्या प्रत्येक लग्नीं तीन 'नृपतियोग' होतात.—शनि, चंद्र हे उच्चस्थ असतां (तू०वृष लग्नीं) व सूर्य बुध कन्येस, तूळेस शुक्र, मेषेस मंगळ, कर्केस गुरु, असे असतां हे "दोन नृपतियोग" होतात.

॥ शिखरिणी ॥ ९.

कुजेतुंगेकेंद्रोर्द्धनुषियमलग्नेचकुपतिःपतिर्भूमेश्चान्यः क्षितिसुतविलग्नेसशशिनि॥सचंद्रेसौरेस्तेसुरपतिगुरौचापधरगेस्वतुंगस्थेभानावुदयमुपयातेक्षितिपतिः ॥

अर्थ—लग्नीं शनि,मंगळ उच्चस्थ (मकर लग्नस्थ); धनेस सूर्य चंद्र,असे योगांवर'भूमिपति'होतो.—मकर लग्नीं चंद्र; मंगळ, रवि धनेस; हा 'दुसरा भूपतियोग,'—मेषलग्नीं सूर्य; धनेस गुरु; शनि चंद्र हे सप्तमस्थानीं (तूळेस); असे योगांवर 'क्षितिपति' होतो.

॥ शिखरिणी ॥ ६

वृषेसेंदौलग्नेसवितृगुरुतीक्ष्णांशुतनयैःसुहृज्जायाखस्थैर्भवतिनियमान्मानवपतिः॥मृगेमंदेलग्नेसहजरिपुधर्मव्ययगतैःशशांकाद्यैःख्यातःपृथुगुणयशाःपुंगलपतिः ॥

अर्थ—लग्नीं वृषभेस चंद्र, चतुर्थस्थानीं रवि, सप्तमस्थानीं गुरु, दशमस्थानीं शनि या योगावर' मानवपति' होतो.—लग्नीं मकरेस शनि, तृतीयस्थानीं चंद्र, षष्ठस्थानीं मंगळ, नवमस्थ बुध, द्वादशस्थ गुरु ह्या योगांवर विस्तीर्ण अशा गुण व कीर्तीनें विख्यात असा तो "मानवपति" होतो.

॥ शिखरिणी ॥ ७

हयेसेंदौजीवेमृगमुखगतेभूमितनयेस्वतुंगस्थौलग्नेभृगुज
शशिजावत्रनृपती॥सुतस्थौवक्रार्कीगुरुशशिसिताश्चा
पिहिबुकेबुधेकन्यालग्नेभवतिहिनृपोन्योपिगुणवान् ॥

अर्थ—धनेस चंद्र व गुरु, मकरपूर्वार्धीं मंगळ, आणि शुक्र बुध हे स्वोच्चस्थ(मीनेस शु. कन्येस बु.), त्या योगावर दोन 'नृपतियोग होतात.'–(लग्नीं) कन्येस बुध; शनि, मंगळ मकरास (पंचमस्थ); व धनेस गुरु, शुक्र व चंद्र (चतुर्थस्थ); ह्या योगांवर 'गुणवान् नृपति' होतो.

॥ शिखरिणी ॥ ८

झषेसेंदौलग्नेघटमृगमृगेंद्रेषुसहितैर्यमारार्कैर्योभूत्सख
लुमनुजःशास्तिवसुधां ॥ अजेसारेमूर्तौशशिगृहगते
चामरगुरौसुरेज्येवालग्नेधरणिपतिरन्योपिगुणवान् ॥

अर्थ—लग्नीं मीनेस चंद्र, कुंभेस शनि, मकरेस मंगळ, सिंहेस सूर्य, ह्या योगांवर जो मनुष्य जन्मास येतो; तो 'पृथ्वीचें राज्य करितो.'–मेष लग्नीं मंगळ व कर्केस गुरु किं०–कर्क लग्नीं गुरु व मेषेस मंगळ ह्या दोनही योगांवर "गुणवान् धरणीपति" होतो.

॥ विद्युन्माला ॥ ९.

कर्किणिलग्नेतत्स्थेजीवेचंद्रासितज्ञैरायप्राप्तैः ॥
मेषगतेर्केजातंविद्याद्विक्रमयुक्तंपृथ्वीनाथं ॥

अर्थ—कर्कलग्नीं गुरु;एकादशस्थ चंद्र, बुध,शुक्र;आणि मेषेस सूर्य (दशमस्थ) असे ग्रहांचे योगावर 'पराक्रमी पृथ्वीनाथ' होतो.

॥ द्रुतविलंबित ॥ १०.

मृगमुखेर्कतनयस्तनुसंस्थःक्रियकुलीरहयोधिप
युक्ताः ॥ मिथुनमौलिसहितौबुधशुक्रौयदितदा
पृथुयशाः पृथ्वीशः ॥

अर्थ—लग्नीं मकरेस शनि, मेषेस मंगळ, कर्केस चंद्र, धनेस सूर्य, मिथुनेस बुध, तूळेस शुक्र, असे योगावर "महान् यशस्वी पृथ्वीनाथ" होतो.

॥ अनुष्टुप् ॥ ११.

स्वोच्चसंस्थेबुधेलग्नेभृगौमेषूरणाश्रिते ॥
सजीवेस्तेनिशानाथेराजामंदारयोःसुते ॥

अर्थ—स्वोच्चस्थ असा (कन्येस) बुध लग्नीं; दशमस्थानीं शुक्र, सप्तमस्थ गुरुचंद्र; पंचमस्थानीं शनि मंगळ, या योगावर 'राजा' होतो.

॥ मालिनी ॥ १२

अपिखलकुलजातामानवाराज्यभाजःकिमुतनृपकु
लोत्थाःप्रोक्तभूपालयोगैः ॥ नृपतिकुलसमुत्थाःपा
र्थिवावक्ष्यमाणैर्भवतिनृपतितुल्यस्तेत्रभूपालपुत्रः ॥

अर्थ—वर सांगितलेले राजयोगांनीं, नीचकुळांतले जरी ते मानव असले तरी 'राजयोगी' होतात; मग राजवं-

शांत उत्पन्न झालेले तर "राज्य भोगणारे होतीलच." पुढें सांगतों या योगांनीं राजवंशांत उत्पन्न होणारे जे; ते 'नृपति'; आणि जे राजवंशीय नसतील त्यांस "नृपतुल्यता" होते.

॥ औपच्छंदसिका ॥ १३

उच्चस्वत्रिकोणगैर्बलस्थैस्त्र्याद्यैर्भूपतिवंशजानरेंद्राः॥
पंचादिभिरन्यवंशजाताहीनैर्वित्तयुतानभूमिपालाः॥

**अर्थ**—तीन ग्रह आपल्या **उच्चराशीस** किंवा आपल्या **मूलत्रिकोणीं** बळिष्ठ असतील, (संज्ञाध्याय २ ह्यांत पहा) तर राजवंशी जे ते 'नरेंद्र' होतील;—आणि चार किं० पांच ग्रह असे असतील तर हीन कुळांतलेही "नरेंद्र" होतील.—जर हे तीन किंवा चार असे असूनही पांच ग्रह बळहीन असे असतील तर राजे न होतां 'धनवान्' मात्र होतील.

॥ विद्युन्माला ॥ १४

लेयास्थेर्केजेंदौलग्नेभौमेस्वोच्चेकुंभेमंदे ॥
चापप्राप्तेजीवेराज्ञःपुत्रंविद्यात्पृथ्वीनाथं ॥

**अर्थ**—मेषलग्नीं चंद्र, सिंहेस सूर्य, धनेस गुरु, मकरेस मंगळ, कुंभेस शनि, असे योगांवर राजपुत्राचा जन्म असेल तर 'पृथ्वीनाथ' होईल असें जाणावें.

॥ विद्युन्माला ॥ १५.

स्वर्क्षेशुक्रेपातालस्थेधर्मस्थानंप्राप्तेचंद्रे ॥
दुश्चिक्यांगप्राप्तिप्राप्तैःशेषैर्जातःस्वामीभूमेः ॥

अर्थ—स्वराशीस शुक्र असून तो चतुर्थस्थानीं (कर्क, कुंभ ह्या लग्नीं), नवमस्थानीं चंद्र, आणि बाकी राहिलेले ग्रह लग्न, तृतीय, एकादश, या स्थानीं असतां या योगावर 'भूमिपति' होतो.

॥ नवमालिका ॥ १६

सौम्येवीर्ययुतेतनुयुक्तेवीर्याढ्येचशुभेशुभयाते ॥
धर्मार्थोपचयेष्ववशेषैर्धर्मात्मानृपजःपृथ्वीशः ॥

अर्थ—तनुस्थानीं बळिष्ठ असा बुध, व शुभ ग्रह हे बळिष्ठ असे शुभ ( नवम किं० चतुर्थ ) स्थानीं, व बाकीचे ग्रह नवम, द्वितीय, उपचय (तृतीय, षष्ठ, दश, एकादश) स्थानीं असतील तर; राजवंशी असल्यास "धर्मात्मा असा पृथ्वीनाथ" होईल.—

॥ नवमालिका ॥ १७

वृषोदयेमूर्तिधनारिलाभगैःशशांकजीवार्कसुतापरैर्नृपः
सुखेगुरौखेशशितीक्ष्णदीधितीयमोदयेलाभगतैर्नृपोपरैः।

अर्थ—लग्नीं वृषभेस चंद्र, धनस्थानीं गुरु, षष्ठस्थानीं शनि व बाकीचे सर्व एकादशस्थानीं असतील तर 'नृप' होतो.—१ लग्नीं शनि, चतुर्थ गुरु, दशम चंद्र सूर्य, व बाकीचे ग्रह एकादशस्थानीं असल्यास 'नृप' होतो.

॥ वसंततिलका ॥ १८

मेषूरणायतनुगाःशशिमंदजीवाज्ञारौधनेसितर
वीहिबुकेनरेंद्रं ॥ वक्रासितौशशिसुरेज्यसिता
र्कसौम्याहोरासुखास्तशुभखाप्तिगताःप्रजेशं ॥

अर्थ–दशमस्थानीं चंद्र ; एकादशस्थानीं शनि ; लग्नीं गुरु; धनस्थानीं बुध, मंगळ; सुखस्थानीं सूर्य, शुक्र; या योगावर 'नरेंद्र' होतो ;–आणि लग्नीं शनि, मंगळ; सुखस्थानीं चंद्र; सप्तम गुरु; नवम शुक्र; दशम सूर्य; लाभस्थ बुध; या प्रकारचे ग्रहयोगावर 'प्रजेश' होतो.

॥ स्वागता ॥ १९

कर्मलग्नयुतपाकदशायांराज्यलब्धिरथवाप्रबलस्य ॥
शत्रुनीचगृहयातदशायांछिद्रसंश्रयदशापरिकल्प्या ॥

अर्थ—लग्नस्थ, किंवा दशमस्थ, किंवा बळिष्ठ असलेल्या ग्रहांच्या दशेमध्यें "राज्यप्राप्ति" होत्ये.–शत्रुगृहीं, नीचगृहीं, अशा ग्रहांची जी दशा ती छिद्रसंश्रयदशा जाणावी. ती "राज्यहानि" करित्ये.

॥ मालिनी ॥ २०

गुरुसितबुधलग्नेसप्तमस्थेर्कपुत्रेवियतिदिवसनाथं
भोगिनांजन्मविंद्यात् ॥ शुभबलयुतकेंद्रैःक्रूरभ
स्थैश्चपापैर्व्रजतिशबरदस्युस्वामितामर्थभाक्च ॥

अर्थ—बुध, गुरु, शुक्र यांतून एकादा लग्नस्थ सप्तमस्थ शनि; दशमस्थ सूर्य ; या योगावर "भोगी जन्म" पावतात.–केंद्रीं बळिष्ठ अशा सौम्य राशि असतील, व पापग्रह हे क्रूरराशीस असतील ; तर अशा योगांवर "भिल्ल, कोळी, चोर, या ज्ञातीचा स्वामी व वित्तवान्" असा तो पुरुष होतो.

॥ राजयोगाध्याय संपूर्ण ॥ ११

---

## ॥ नाभसयोगाध्यायः ॥ १२

### (आकाशांतील वेगवेगळ्या भागांमध्यें ग्रहांचे योग)



॥ औपच्छंदसिका ॥ १

नवदिग्वसवस्त्रिकाग्निवेदैर्गुणिताद्वित्रिचतुर्विकल्प
जाःस्युः ॥ यवनैस्त्रिगुणाहिषट्शतीसाकथिताविस्तरतोत्रतत्समाःस्युः ॥

अर्थ—नवांची तिप्पट २७, दहांची तिप्पट ३० व आठांची चौपट ३२ हे भेद ७ व २० हे दोन मिळून २७ व यांत ३ मिळून ३० व यांत २ मिळून एकंदर ३२ योग होतात. (संख्यायोग ७, आकृतियोग २०, आश्रययोग ३ दलयोग २ मिळून ३२ योग आहेत.) यवनाचार्य यांणीं तर साहाशें या संख्येची तिप्पट १८०० इतके प्रकारचे योग विस्तारानें सांगितले आहेत. एथें तर त्यांचा संक्षेप केला आहे. (ते सर्व ह्या ३२ सांत येतात.)

॥ औपच्छंदसिका ॥ २

रज्जुर्मुशलंनलश्चराद्यैःसत्यश्चाश्रयजान्जगादयोगान् ॥ केंद्रैःसदसद्युतैर्दलाख्यैःस्त्रक्सर्पौकथितौपराशरेण ॥

अर्थ—चर राशीवर सर्व ग्रह आले असतां तो 'रज्जु'

योग होतो.—स्थिर राशीवर सर्व ग्रह आले असतां तो 'मुशल' योग होतो.—द्विस्वभाव राशीवर सर्व ग्रह आले असतां तो 'नल' योग होतो.—हे तीन 'आश्रययोग' सत्याचार्य यांणीं सांगितलेले आहेत.—केंद्रीं सर्व शुभग्रह असले तर तो 'स्रक् (माळा) योग' होतो.—केंद्रीं सर्व पापग्रह असले तर तो 'सर्पयोग' होतो. या प्रकारें हे दोन 'दलयोग' पराशरांनीं सांगितले आहेत.

॥ उपजातिका ॥ ३

**योगाव्रजंत्याश्रयजाःसमत्वंयवाब्जवज्रांडजगो लकाद्यैः ॥ केंद्रोपगैःप्रोक्तफलैर्दलाख्यावित्या हुरन्येनपृथक्फलैस्तौ ॥**

**अर्थ**—यव, अब्ज, वज्र, अंडज, गोलक इत्यादिक योग आश्रययोगासारिखेच आहेत व केंद्रीं असणारे ग्रहांचे-ही योग वर सांगितलेले दलयोगांचे फळाप्रमाणें अन्य आचार्यांनीं सांगितलेले आहेत. यास्तव हे एथें पृथक् सांगितले नाहींत.

॥ वसंततिलका ॥ ४

**आसन्नकेंद्रभवनद्वयगैर्गदाख्यस्तन्वस्तगेषुशकटं विहगःखबंध्वोः॥शृंगाटकंनवमपंचमलग्नसंस्थै र्लग्नान्यगैर्हलमितिप्रवदंतितज्ज्ञाः ॥**

**अर्थ**—सन्निध असणाऱ्या दोन केंद्रांवर सर्व ग्रह असतील तर तो 'गदाख्य योग' होतो.——लग्न, सप्तम या दोन केंद्रांवरच सर्व असणारे ग्रहांचा 'शकट योग होतो.—दशम, चतुर्थस्थ असणारे ग्रहांचा 'विहंग' योग होतो.—लग्न, नव, पंचम, या स्थानीं सर्व ग्रह असले तर तो 'शृंगाटक' योग होतो,—व लग्नावांचून अन्यस्थानीं असा ग्रहयोग असतां; तो 'हल' योग होतो. असें होराशास्त्रज्ञात्यांहीं सांगितलेलें आहे.

॥ वैतालिका ॥ ५

**शकटांडवच्छुभाशुभैर्वज्रंतद्विपरीतगैर्यवः ॥**
**कमलंतुविमिश्रसंस्थितैर्वापीतद्यदिकेंद्रबाह्यतः ॥**

**अर्थ**—चारही केंद्रांवर शकटाप्रमाणें शुभ व विहंगाप्रमाणें अशुभ ह्मणजे लग्न, सप्तम या केंद्रांवर शुभ आणि चतुर्थ दशम या केंद्रांवर पाप असे ग्रह असतील, तर तो 'वज्र' योग होतो,—व याहून उलट क्रमानें ह्मणजे लग्न, सप्तम या केंद्रीं पापग्रह, चतुर्थ दशम या केंद्रीं शुभ ग्रह असतां तो 'यव' योग होतो.—व तेच शुभ व पापग्रह चारही केंद्रांवर मिश्र असतां 'कमल' योग होतो.—केंद्रांशिवाय पणफर आपोक्लिमस्थ असे ग्रह असले तर तो 'वापी' योग होतो.

॥ अनुष्टुप् ॥ ६

**पूर्वशास्त्रानुसारेणमयावज्रादयःकृताः ॥**
**चतुर्थेभवनेसूर्याज्ज्ञसितौभवतःकथम् ॥**

अर्थ--पूर्वशास्त्रांच्या आधारानें हे मी (वराहमिहिर) वज्रादिक योग केले आहेत. परंतु बुध, शुक्र हे सूर्या-पासून, चतुर्थस्थानीं कसे होतील ?

॥ अनुष्टुप् ॥ ७

कंटकादिप्रवृत्तैस्तुचतुर्गृहगतैर्ग्रहैः ॥
यूपेषुशक्तिदंडाख्याहोराद्यैःकंटकैःक्रमात् ॥

अर्थ—केंद्रापासून, चार स्थानांमध्यें सर्व ग्रह असले तर हे योग होतात;—लग्न, द्वितीय, तृतीय, चतुर्थ, या स्थानीं सर्व ग्रह असतां 'यूप',—चतुर्थ, पंचम, षष्ठ, सप्तम या स्थानीं असतां 'शर',—सप्तमापासून दशमापर्यंत० 'शक्ति',—दशमापासून लग्नापर्यंत० 'दंड'—असे योग होतात.

॥ अनुष्टुप् ॥ ८

नौकूटछत्रचापानितद्वत्सप्तर्क्षसंस्थितैः ॥
अर्धचंद्रस्तुनावाद्यैःप्रोक्तस्त्वन्यर्क्षसंस्थितैः ॥

अर्थ—वरप्रमाणेंच केंद्रापासून सात स्थानीं सर्व ग्रह असतां हे योग होतात. लग्न, द्वितीय, इत्यादि पुढें सप्तम स्थानापर्यंत ग्रह असतां तो 'नौका' योग.—चतुर्थ, पंचम इ० दशमापर्यंतांचा 'कूट' योग.—सप्तम अष्टम इ० लग्नापर्यंतांचा 'छत्र' योग.—दशम, एकादश, इ० चतुर्थ स्थानापर्यंतांचा 'चाप' योग.—वरचे योगांशिवाय अशा सात स्थानीं क्रमानें ग्रह असतां तो 'अर्धचंद्र' योग होतो, (द्वादश स्थानांतून चार केंद्रेंरहित यास्तव याचे आठ प्रकार आहेत.)

॥ अनुष्टुप् ॥ ९

एकांतरगतैरर्थात्समुद्रःषड्गृहाश्रितैः ॥
विलग्नादिस्थितैश्चक्रमित्याकृतिजसंग्रहः ॥

अर्थ——द्वितीय स्थानापासून एकांतर स्थानीं (२।४।६।८।१०।१२) अशा साहा स्थानीं सर्व ग्रह असतां तो 'समुद्र' योग होतो.—तोच लग्नापासून एकांतरस्थ (१।३।५।७।९।११) असतां 'चक्र' योग होतो.—या प्रकारें 'आकृतियोगांचा संग्रह' केला आहे.

॥ शालिनी ॥ १०

संख्यायोगाःस्युः सप्तसप्तर्क्षसंस्थैरेकापायाद्वल्लकीदामिनीच ॥ पाशःकेदारःशूलयोगोयुगंचगोलश्चान्यान्पूर्वमुक्तान्विहाय ॥

अर्थ—संख्यायोग असे होतात.—सातही ग्रह एकामागून एक असे सात स्थानीं असतील तर तो 'वल्लकी' योग होतो.—तेच सातही ग्रह साहा स्थानीं एकामागून एक असतील तर तो 'दामिनी' योग होतो.—तेच पांच स्थानीं असे असतां तो 'पाश' योग०—चार स्थानीं असतां 'केदार'०—तीन स्थानीं 'शूल'—दोन स्थानीं 'युग'—एकच स्थानीं अ० 'गोल'—या प्रकारें, जर वर सांगितलेल्या योगांस बाध येत नसेल ; तर हे योग होतात असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ ११

ईर्ष्युर्विदेशनिरतोध्वरुचिश्चरज्ज्वांमानीधनीचमु
शलेबहुकृत्यसक्तः॥व्यंगस्थिराढ्यनिपुणोनलजः
स्रगुत्थोभोगान्वितोभुजगजोबहुदुःखभाक्स्यात् ॥

**अर्थ**—**रज्जुयोगाचें फळ**—मत्सरी, विदेशवासी, भ्रमणशील; **मुशलयोगाचें फळ**—मानशील, धनवान्, अनेक कार्यासक्त; **नलयोगाचें फळ**—अंगहीन, स्थिर, धनाढ्य, निपुण; **स्रक्योगाचें फळ**—भोगवान्; **सर्प यो०फ०**—अनेक प्रकारचीं दुःखें भोगणारा.

॥ अनुष्टुप् ॥ १२

आश्रयोक्तास्तुविफलाभवंत्यन्यैर्विमिश्रिताः ॥
मिश्रायैस्तेफलंदद्युरमिश्राः स्वफलप्रदाः ॥

**अर्थ**—अन्य योगांनीं (यवादिक) मिश्र असतां हे आश्रययोग निष्फळ होऊन, जे मिश्र झाले असतील त्यांचीं फळें होतात. आणि हे योग अमिश्र असतां मात्र स्वफल देतात. असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ १३

यज्वार्थभाक्सततमर्थरुचिर्गदायांतद्वृत्तिभुक्श
कटजःसरुजःकुदारः॥दूतोटनःकलहकृद्विहगे
प्रदिष्टःशृंगाटकेचिरसुखीकृषिकृद्धलाख्ये ॥

**अर्थ**--**गदायोगाचें फळ**—यजनकर्ता, धनवान्, सर्वदा द्रव्योपार्जनप्रीति; **शकटयोगाचें फळ**—शकटोपजीवी,

सदारोगी, दुष्टस्त्री ; **विहंगयोगा०**—दूत, भ्रमणशील, कलही ; **शृंगाटक योगा०**—अंत्य वयांत सुखी ; **हल० यो०**—कृषिकर्मकर्ता (शेती).

॥ वसंततिलका ॥ १४

**वज्रेंत्यपूर्वसुखिनःसुभगोतिशूरोवीर्यान्वितोप्यथ**
**यवेसुखितोवयोंतः ॥ विख्यातकीर्त्यमितसौख्य**
**गुणश्चपद्मेवाप्यांतनुस्थिरसुखोनिधिकृन्नदाता ॥**

**अर्थ—वज्रयोगा फ०**—बाल्य आणि वृद्धपण यां मध्यें सुखी, स्वरूपवान्, अतिशूर ; **यवयोगा फ०**—पराक्रमी, मध्य वयांत सुखी ; **पद्मयोगा०फ०**—कीर्तिमान्, अपरिमित सौख्य व गुणेंकरून युक्त; **वापीयोगा०**—सर्वकाळ अल्पसौख्य, गुप्तधन (ठेवा), ठेवणारा, कृपण (कद्रू).

॥ वसंततिलका ॥ १५

**त्यागात्मवान्क्रतुवरैर्यजतेचयूपेहिंस्त्रोथगुप्त्यधि**
**कृतःशरकृच्छराख्ये ॥ नीचोलसःसुखधनैर्वि**
**युतश्चशक्तौदंडेप्रियैर्विरहितःपुरुषोंत्यवृत्तिः ॥**

**अर्थ—यूप यो०**—त्यागी (दाता), आत्मवान् (अवधानी), मोठाले यज्ञ करणारा ; **शरयो०**—हिंसक, कारागृहाधिकारी ( जेलर ), बाणें करणारा; **शक्ति यो०**—नीच, आळशी, असुखी, निर्धन ; **दंड यो०**—प्रियजनहीन, नीचवृत्ति.

॥ वसंततिलका ॥ १६

कीर्त्यायुतश्चलसुखः कृपणश्चनौजः कूटेनृतप्लव
नवंधनपश्चजातः ॥ छत्रोद्भवःस्वजनसौख्यक
रोंत्यसौख्यःशूरश्चकार्मुकभवःप्रथमांत्यसौख्यः॥

अर्थ—नौका यो०-कीर्तिमान्, अस्थिरसुख, कृपण; कूट यो०-असत्यभाषणी, बंधन पावणारा; छत्र यो०-स्वजनास सौख्य देणारा, आणि अंत्य वयामध्यें सुखी; चाप यो०-शूर, प्रथम व अंत्य वयामध्यें सुखी.

॥ वसंततिलका ॥ १७

अर्धेंदुजःसुभगकांतवपुःप्रधानस्तोयालयेनरप
तिप्रतिमस्तुभोगी ॥ चक्रेनरेंद्रमुकुटद्युतिरंजि
तांघ्रीवीणोद्भवश्चनिपुणःप्रियगीतनृत्यः ॥

अर्थ—अर्धचंद्र यो०फ०-सौभाग्यवान्, शरीर कांतीनें युक्त; समुद्र यो०फ०-राजासारिखे भोग भोगणारा; चक्र यो०फ०-नरेंद्र जे त्यांच्या मुगुटांच्या प्रभा ज्याचे चरणकमलांवर शोभताहेत असा होतो. वीणा यो०फ०-निपुण, गीत व नृत्य यांचे ठायीं प्रीति.

॥ वसंततिलका ॥ १८

दातान्यकार्यनिरतःपशुपश्चदाम्निपाशेधनार्जन
विशीलसभृत्यबंधुः ॥ केदारजःकृषिकरःसुब
हूपयोज्यःशूरःक्षतोधनरुचिर्विधनश्चशूले॥

अर्थ—दामिनी योगाचें फ०—दाता, परकार्यतत्पर, पशुपालक;—पाश यो० फ०—द्रव्योपार्जनशील, आणि सेवक व बंधु यांहींकरून युक्त;—केदार योगा० फ०—कृषि कर्म करणारा (शेती), आणि बहुतांचे कामीं येणारा;—शूल यो० फ०—शूर, जखमी, धनप्रिय, द्रव्यहीन.

॥ हरिणी ॥ १९

धनविरहित:पाखंडीवायुगेत्वथगोलकेविधनम
लिनोज्ञानेपेत:कुशिल्प्यलसोटनः ॥ इतिनिग
दितायोगा:सार्धंफलैरिहनाभसानियतफलदा
श्चित्याह्येतेसमस्तदशास्वपि ॥

अर्थ—युग यो०फ०—द्रव्यहीन आणि पाखंडी;—गोल-यो० फ० —निर्धन, मलिन, मूर्ख, कुशिल्पी, आळशी, हिंडणारा ;—या प्रकारें. हे नाभसयोग फळांसह सांगितले. ते आपआपल्या ग्रहांच्या दशांमध्यें निरंतर फलप्रद होतात असें जाणावें.

॥ नाभसयोगाध्यायसंपूर्ण ॥ १२

---

## ॥ चंद्रयोगाध्याय: ॥ १३

( ग्रहांचा चंद्राशीं समागम )



॥ मालिनी ॥ १

अधमसमवरिष्ठान्यर्ककेंद्रादिसंस्थेशशिनिविनय

वित्तज्ञानधीनैपुणानि ॥ अहनिनिशिचचंद्रेस्वेधि मित्रांशकेवासुरगुरुसितदृष्टेवित्तवान्स्यात्सुखीच ॥

**अर्थ**—विनय, वित्त, ज्ञान, वुद्धि, नैपुण्य, हीं फळें चंद्र, हा सूर्याचे केंद्रीं असला, तर **अधम** ; जर पणफरस्थ असला तर **मध्यम**; आणि आपोक्लिमस्थ असेल तर **श्रेष्ठ** होतात.—दिवसाचे जन्मावर गुरूची दृष्टि किं० रात्रीचे जन्मावर शुक्राची दृष्टि असून, चंद्र हा स्वनवांशीं किं० मित्र नवांशीं असला तर, 'वित्तवान् आणि सुखी' असा होतो.

॥ वसंततिलका ॥ २

सौम्यैःस्मरारिनिधनेष्वधियोगइंदोस्तस्मिंश्चमूप सचिवक्षितिपालजन्म॥संपन्नसौख्यविभवाह तशत्रवश्चदीर्घायुषोविगतरोगभयाश्चजाताः ॥

**अर्थ**—चंद्रापासून, साहा, सात, व आठ, ह्या स्थानीं सौम्य ग्रह जर असतील तर तो "**अधियोग**" होतो. याचीं फळें. (बळानुसार) सैन्यपति, सचिव, राजा अशीं होऊन; सौख्य, वैभवानीं संपन्न; जितशत्रु, दीर्घायु, रोग व भयरहित असें जन्म पावणारे होतात.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ३

हित्वार्कंसुनफानफादुरुधराःस्वांत्योभयस्थैर्ग्रहैःशी तांशोःकथितोन्यथानुबहुभिः केमद्रुमोन्यैस्त्वसौ ॥

केंद्रेशीतकरेथवाग्रहयुतेकेमद्रुमोनेष्यतेकेचित्केंद्रन
वांशकेषुचवदंत्युक्तिप्रसिद्धानते ॥

अर्थ—सूर्यावांचून कोणीही ग्रह चंद्राच्या द्वितीयस्थानीं असला तर तो 'सुनफा योग' होतो.—व द्वादशस्थानीं असला तर 'अनफा योग' होतो.—आणि द्वितीय, द्वादश या दोहों स्थानीं ग्रह असले तर तो 'दुरुधरा' योग होतो.—हे योग बहुत आचार्यांनीं सांगितलें आहेत. चंद्राचे द्वितीय द्वादशस्थानीं कोणीच ग्रह नसेल तर तो 'केमद्रुम' योग होतो.—परंतु जर चंद्राशीं युक्त किं० त्याच्या केंद्रीं कोणी तरी ग्रह असला तर तो योग होत नाहीं. कित्येक केंद्र नवमांशीं पण हा योग सांगतात; परंतु तें प्रसिद्ध नाहीं.

॥ इंद्रवज्रा ॥ ४

त्रिंशत्सरूपाःसुनफानफाख्याःषष्टित्रयंदौरुध
रेप्रभेदाः॥इच्छाविकल्पैःक्रमशोभिनीयनीतेनि
वृत्तिःपुनरन्यनीतिः ॥

अर्थ—सुनफा व अनफा यांचे भेद प्रत्येकीं ३१, ३१ आहेत. आणि दुरुधरा योगाचे भेद १८० आहेत. ते ग्रहांचे फेरफार केल्यानें इच्छित भेद स्पष्ट होतात.

॥ इंद्रवज्रा ॥ ५

स्वयमधिगतवित्तः पार्थिवस्तत्समोवाभवतिहिसुन
फायांधीधनाख्यातिमांश्च ॥ प्रभुरगदशरीरःशील
वान्ख्यातकीर्तिर्विषयसुखसुवेषोनिर्वृतश्चानफायाम्॥

**अर्थ**—सुनफायोगाचें फळ—स्वोपार्जितद्रव्य; राजा किं० राजतुल्य; बुद्धि, द्रव्य, कीर्ति, यांहीं करून युक्त;—**अनफायो० फ०**—प्रभु, निरोगी, शीलवान्, प्रख्यातकीर्ति, विषयसुखी, सुवेषी, निर्वेध,—

॥ वसंततिलका ॥ ६

**उत्पन्नभोगसुखभुग्धनवाहनाढ्यस्त्यागान्वितोदुरुधराप्रभवःसुभृत्यः ॥ केमद्रुमेमलिनदुःखितनीचनिःस्वाःप्रेष्याःखलाश्चनृपतेरपिवंशजाताः ॥**

**अर्थ**—दुरुधरायोगा०फ०—उत्पन्नभोगी; सुख भोगणारा; धन, वाहन, याहीं युक्त; उदार, आणि उत्तम सेवकांनीं युक्त; —**केमद्रुमयो० फ०**—मलिन, दुःखित, निर्धन, जासूद, खळ, हीं फळें राजकुळांत असणारांसही होतात.

॥ वसंततिलका ॥ ७।८

**उत्साहशौर्यधनसाहसवान्महीजःसौम्यःपटुःसुवचनोनिपुणःकलासु ॥ जीवोर्थधर्मसुखभाग्नृपपूजितश्चकामीभृगुर्बहुधनोविषयोपभोक्ता ॥ पुष्पिताग्रा॥८॥ परविभवपरिच्छदोपभोक्तारवितनयोबहुकार्यकृद्गणेशः॥अशुभकृदुडुपो.ह्निदृश्यमूर्त्तिर्गलिततनुश्चशुभोन्यथान्यदूह्यम् ॥**

**अर्थ**—वरचे योग ज्या ग्रहानीं उत्पन्न होतात त्यांचीं फळें खालीं सांगितलीं आहेत.

मंगळ.—उत्साही, शौर्यवान्, धनवान्, साहसी.
बुध.—दक्ष, मधुरवचन, कलानिपुण,
गुरु.—धन, धर्म, सुख, यांचा भोक्ता; राजपूज्य.
शुक्र.—कामासक्त, बहुधन, विषयोपभोगी.
शनि.—परवैभव, परसाहित्यें, यांचा उपभोक्ता, बहुत कार्य करणारा, अध्यक्ष.

चंद्र हा दृश्य गोलार्धीं (आकाशभागीं) असतां, दिवसास जन्म अशुभ व रात्रीचा जन्म शुभ;—तोच अदृश्य गोलार्धीं (पाताळभागीं) असतां, दिवसा जन्म शुभ, व रात्रीचा जन्म अशुभ, असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ ९

लग्नादतीववसुमान्वसुमांश्छशांकात्सौम्यग्रहैरुपचयोपगतैःसमस्तैः ॥ द्वाभ्यांसमोल्पवसुमांश्चतदूनतायामन्येष्वसत्स्वपिफलेष्विदमुत्कटेन ॥

अर्थ—चंद्रापासून उपचयस्थानीं (३, ६, १०, ११) सर्व शुभ ग्रह असतील; तर 'द्रव्यवान्;—आणि असेच लग्नापासून जर असतील तर 'अतिशयित द्रव्यवान्';—या प्रकारें जर दोनच शुभ ग्रह असतील तर 'सामान्य द्रव्यवान्;'—यांहून कमी असतां 'अल्प द्रव्यवान्;'—फलाविषयीं अन्य योग जरी अशुभ असले तरी हे ग्रह प्राबल्येंकरून शुभ फळ प्राप्त करितात असें जाणावें.

॥ चंद्रयोगाध्याय संपूर्ण ॥ १३

## ॥ द्विग्रहयोगाध्यायः ॥ १४

### ( दोन ग्रहांचा समागम )



॥ शार्दूलविक्रीडित ॥ १

तिग्मांशुर्जनयत्युषेशसहितोयंत्राश्मकारंनरंभौ
मेनाघरतंबुधेननिपुणंधीकीर्तिसौख्यान्वितं ॥
क्रूरंवाक्पतिनान्यकार्यनिरतंशुक्रेणरंगायुधैर्ल
ब्धस्वंरविजेनधातुकुशलंभांडप्रकारेषुवा ॥

अर्थ—सूर्याशीं दुसरे ग्रह युक्त असतां त्यांचीं फळें सांगतों.
चंद्र, सूर्य—यंत्रे करणारा, पाषाण घडणारा.
मंगळ ,, —पापासक्त.
बुध, ,, —निपुण, बुद्धिमान्, कीर्तिमान्, सौख्यवान्.
गुरु, ,, —क्रूर, परकार्यरत.
शुक्र, ,, —रंग, युक्ति, आयुध, यांहीं करून द्रव्य प्राप्त.
शनि, ,, —धातु ( भांडीं, डागडागिने ) घडण्यांत कुशळ.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ २

कूटस्त्र्यासवकुंभपण्यमशिवंमातुःसवक्रःशशीसज्ञः
प्रसृतवाक्यमर्थनिपुणंसौभाग्यकीर्त्यान्वितं ॥ विक्रां
तंकुलमुख्यमस्थिरमतिंवित्तेश्वरंसांगिरावस्त्राणांस
सितःक्रियादिकुशलंसार्किः पुनर्भूसुतम् ॥

अर्थ—चंद्राशीं अन्यग्रह युक्त असतां त्यांचीं फळें.
मंगळ--कृत्रिम,स्त्री,मद्य,कुंभ,यांचा विक्रयी,मातेस अनिष्ट.
बुध—विस्तृतवाणी, द्रव्योपार्जनदक्ष, सौभाग्य, कीर्तियुक्त.
गुरु—शत्रुजेता, कुलमुख्य, अस्थिरमति, धनिक.
शुक्र—वस्त्रक्रियेंत कुशल (शिवणें, विणणें,रंगविणें इ०).
शनि—दुसऱ्यानें पाणिग्रहण झालेल्या मातेचा सुत.

॥ स्रग्धरा ॥ ३

मूलादिस्नेहकूटैर्व्यवहरतिवणिग्बाहुयोद्धाससौम्ये
पुर्यध्यक्षःसजीवेभवतिनरपतिःप्राप्तविद्योद्विजोवा॥
गोपोमल्लोथदक्षःपरयुवतिरतोद्यूतकृत्सासुरेज्येदुः
खार्तोसत्यसंधः ससवितृतनयेभूमिजेनिंदितश्च ॥

अर्थ—मंगळाशीं अन्यग्रह युक्त असतां त्याचीं फळें.
बुध मंगळ—मूलादिक—तैलें, यांचा कृत्रिमविक्रय, मल्ल.
गुरु ,, —ग्राममुख्य, किं० नरपति, द्विज, किं० पंडित.
शुक्र ,, —गोपालक, मल्ल, दक्ष, परस्त्रीरत, जुगारी,
शनि ,, —दुःखी, खोटें वचन देणारा, निंदित.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ४

सौम्येरंगचरोबृहस्पतियुतेगीतप्रियोनृत्यविद्वाग्मी
भूगणपः सितेनमृदुनामायापटुर्लंघकः ॥ सद्विद्यो
धनदारवान्बहुगुणःशुक्रेणयुक्तेगुरौज्ञेयः श्मश्रुक
रोऽसितेनघटकृज्जातोऽन्नकारोपिवा ॥

अर्थ—बुधाशीं व गुरुशीं ग्रह युक्त असतां त्यांचीं फळें.
गुरु बुध—मल्ल, गीताप्रिय, नृत्यज्ञाता.
शुक्र ,, —वक्ता, अनेक जमिनींचें स्वामित्व.
शनि ,, —मायावी, अमर्याद.
शुक्र गुरु—सुविद्य, स्त्री व धन यांनीं युक्त, बहुगुणी.
शनि ,, —श्मश्रुकार, किं० कुंभकार, किं० स्वयंपाकी.

॥ पुष्पिताग्रा ॥ ९

असितसितसमागमेल्पचक्षुर्युवतिसमाश्रयसंप्र
वृद्धवित्तः ॥ भवतिचलिपिपुस्तचित्रवेत्ताकथि
तफलैःपरतोविकल्पनीयः ॥

अर्थ—शुक्र शनि—अल्पचक्षु, स्त्रियांचे आश्रयानें द्रव्य-वृद्धि; लिपि, पुस्तक, चित्र यांचा मर्मज्ञ—या प्रकारें दोहोंहून अधिक ग्रह युक्त असले तरी वर सांगितलेल्या फळांवरून, फळांची कल्पना करावी.

॥ द्विग्रहयोगाध्यायसंपूर्ण ॥ १४

---

## ॥ प्रव्रज्यायोगाध्यायः ॥ १५

### ( वैराग्य दीक्षा योग. )



॥ शार्दूलविक्रीडित ॥ १

एकस्थैश्चतुरादिभिर्बलयुतैर्जाताःपृथग्वीर्यगैःशा
क्याजीविकभिक्षुवृद्धचरकानिर्ग्रंथवन्याशनाः ॥

महियज्ञगुरुक्षपाकरसितप्राभाकरीनैःक्रमात्प्रव्र
ज्याबलिभिःसमाःपरजितैस्तत्स्वामिभिःप्रच्युतिः ॥

**अर्थ**—एका स्थानीं एकत्र असलेल्या ग्रहांमध्यें चार ग्रह जर पृथक् बळिष्ठ असले तर ते 'प्रव्रज्या (दीक्षा) योग' उत्पन्न करितात. त्यांत जे बळानें अधिक असतील त्यांसारिखी ती प्रव्रज्या होत्ये. परंतु जो ग्रह पराजित (दक्षिणेस) असेल त्याचे दशेमध्यें त्याची ती 'प्रव्रज्या नष्ट' होत्ये. कोणता ग्रह कोणती प्रव्रज्या (दीक्षा) देतो तें खालीं दाखविलें आहे.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **ग्रह.**— | **सूर्य,** | **चंद्र,** | **मंग०,** | **बुध,** | **गुरु,** | **शुक्र,** | **शनि,** |
| प्रव्र०— | वन्याशन, | वृद्धश्रा, | शाक्य, | भिक्षु, | आजिविक, | चरक, | निर्ग्रंथ. |
| अर्थ.— | तपस्वी. | कापालि, | रक्तपट, | दंडी, | ना० | स्वरू.चक्र० | क्षप० |
| सेवन.— | अग्नि, | हर, | बौद्ध, | भागवत, | वेदांत | ब्रह्म. | नग्न. |

॥ वैतालिका ॥ २

रविलुप्तकरैरदीक्षिताबलिभिस्तद्गतभक्तयोनराः ॥
अभियाचितमात्रदीक्षितानिहतैरन्यनिरीक्षितैरपि॥

**अर्थ**—रवीमध्यें अस्तंगत झालेले ग्रह "दीक्षायोग करीत नाहींत." जर ते तेथें बळिष्ठ असतील तर "तद्भक्त" मात्र होतो; परंतु जर ते तेथेंही अन्य ग्रह दृष्ट असून पराजितही, असतील तर; "दीक्षा मागेल मात्र."

॥ मालिनी ॥ ३

जन्मेशोन्यैर्यद्यदृष्टोर्किपुत्रंपश्यत्यार्किर्जन्मपंवाव
लोनम् ॥दीक्षांप्राप्नोत्यार्किदृक्काणसंस्थेभौमार्क्यं
शेसौरदृष्टेचचंद्रे ॥

**अर्थ**—जन्म ह्मणजे चंद्रस्थित राशि:--तिच्या स्वामीवर कोणत्याही ग्रहाची दृष्टि नसून, तो (राशिस्वामी) मात्र शनीस पाहात असेल,—किंवा शनि बलहीन असतां त्या जन्मराशीच्या स्वामीस पाहात असेल, तर "दीक्षा प्राप्त" होईल,—चंद्र हा शनीच्या द्रेष्काणीं;—किं० शनि हा मंगळाच्या नवमांशीं असेल आणि त्यावर शनीची मात्र दृष्टि असेल तरी 'दीक्षा प्राप्त' होईल.

॥ मालिनी ॥ ४

सुरगुरुशशिहोरास्वार्किदृष्टासुधर्मेगुरुरथनृप
तीनांयोगजस्तीर्थकृत्स्यात् ॥ नवमभवनसंस्थेमं
दगेन्यैरदृष्टेभवतिनरपयोगेदीक्षित:पार्थिवेंद्र: ॥

**अर्थ**—गुरु, चंद्र, लग्न हे शनीच्या दृष्टीनें युक्त असतील, व बृहस्पति हा नवमस्थानीं असेल तर राजयोगी असतांही 'शास्त्रकार' होतो.—नवमस्थानीं शनि हा अन्यग्रहांनीं अदृष्ट असा असेल; तर राजयोग असतां दीक्षित होत्साता भूमिपतिही होतो.

॥ प्रव्रज्यायोगाध्याय संपूर्ण ॥ १५

---

## ॥ राशिशीलाध्याय: ॥ १६

( ग्रहस्थित राशीवरून, जन्माचें स्वरूपज्ञान. )

॥ चंद्रस्थित राशिस्वरूपं ॥



॥ आर्या ॥ १ – १४

प्रियभूषण:सुरूप:सुभगोदक्षोश्विनीषुमतिमांश्च ॥ कृ

तनिश्चयःसत्यारुग्दक्षःसुखितश्चभरणीषु ॥ १ बहुभु
क्परदाररतस्तेजस्वीकृत्तिकासुविख्यातः॥रोहिण्यांस
त्यशुचिःप्रियंवदःस्थिरमतिःसुरूपश्च ॥२॥ चपलश्च
तुरोभीरुःपटुरुत्साहीधनीमृगेभोगी ॥ शठगर्वितःकृत
घ्नोहिंस्रःपापश्चरौद्रर्क्षे ॥३॥ दांतःसुखीसुशीलोदुर्मेधा
रोगभाक्पिपासुश्च ॥ अल्पेनचसंतुष्टःपुनर्वसौजायते
मनुजः ॥ ४ शांतात्मासुभगःपंडितोधनीधर्मसंसृतः
पुष्ये ॥ शठःसर्वभक्षःपापःकृतघ्नधूर्तश्चभौजंगे ॥५॥
बहुभृत्यधनोभोगीसुरपितृभक्तोमहोद्यमःपित्र्ये ॥ प्रिय
वाग्दाताद्युतिमानटनोनृपसेवकोभाग्ये ॥६॥ सुभगोवि
द्याप्तधनोभोगीसुखभाग्द्वितीयफाल्गुन्याम् ॥ उत्साही
धृष्टःपानपोऽघृणीतस्करोहस्ते॥७॥ चित्रांबरमाल्यधरः
सुलोचनांगश्चभवतिचित्रायां ॥ दांतोवणिक्कृपालुः
प्रियवाग्धर्माश्रितःस्वातौ ॥८॥ ईर्ष्युर्लुब्धोद्युतिमान्वचन
पटुःकलहकृद्विशाखासु ॥ आढ्योविदेशवासीक्षुधालुर
टनोऽनुराधासु ॥ ९ ॥ ज्येष्ठासुनबहुमित्रःसंतुष्टोधर्मकृ
त्प्रचुरकोपः॥ मूलेमानीधनवान्सुखीनहिंस्रःस्थिरोभो
गी॥१०॥ इष्टानंदकलत्रोमानीदृढसौहृदश्चजलदेवे ॥
वैश्वेविनीतधार्मिकबहुमित्रःकृतज्ञःसुभगश्च ॥ ११ ॥
श्रीमान्श्रवणेश्रुतवानुदारदारोधनान्वितःख्यातः॥ दा
ताआढ्यःशूरोगीतप्रियोधनिष्ठासुधनलुब्धः॥१२॥स्फु
टवाग्व्यसनीरिपुहासाहसिःशतभिषजिदुर्ग्राह्यः॥भाद्र

पदासूद्विष्टःस्त्रीजितधनीपटुरदाताच ॥ १३ वक्तासु स्त्रीप्रजावान्जितशत्रुर्धार्मिकोद्वितीयासु॥संपूर्णांगःसुभगःशूरःशुचिरर्थवान्पौष्णे ॥ १४ ॥ इतिऋक्षशीलं॥

अर्थ–जन्मनक्षत्रांचीं फळें. (त्या नक्षत्रीं चंद्र असतो)

अश्वि०–भूषणप्रिय, सुरूप, सुभाग्य, दक्ष, बुद्धिमान्.
भर०–कृतनिश्चयी, सत्य, निरोगी, दक्ष, सुखी.
कृत्ति०–बहुभोजन, परदारासक्त, तेजस्वी, विख्यात,
रोहि०–सत्य, शुचि, मधुरवचनी, स्थिरमति, सुरूप.
मृग०–चपल, चतुर, भित्रा, निपुण, उत्साही, धनिक, आणि भोगी.
आर्द्रा०–शठ, गर्वी, कृतघ्न, हिंसक, आणि पापिष्ठ.
पुन०–शांत, सुखी, सुशीळ, मंदबुद्धि, रोगी, संतुष्ट.
पुष्य०–शांतचित्त, सुभाग्य, पंडित, धनिक, धर्मशील.
आश्ले०–शठ, सर्वभक्षी, पापकर्ता, कृतघ्न व धूर्त.
मघा०–सेवक व धन हीं विपुल, भोगी, देवपितृभक्त, आणि महान् उद्योगी. [-णारा, व राजसेवक.
पू० फा०–प्रियभाषण, दाता, कांतिमान्, हींड-
उ० फा०–सुभाग्य, विद्योपार्जित धन, भोगी, सुखी.
हस्त०–उत्साही, निर्लज्ज, पानप्रिय, तस्कर, निर्दय.
चित्रा०–वस्त्रें व पुष्पें विचित्रधारी शरीर, नेत्र सुंदर.
स्वाती०–शांत, वैश्य, कृपाळू, मधुरवचन, धर्माश्रित.
विशा०–ईर्षित, लोभी, सुकांति, वाक्चतुर, कलही.
अनु०–धनाढ्य, विदेशवासी, क्षुधाळु, व हिंडणारा.
ज्येष्ठा०–अल्पमित्र, संतोषी, धार्मिक, बहुकोपशील.

मूल०—गर्विष्ठ,धनवान्, सुखी,अहिंसक,स्थिर, भोगी.
पूर्वा०—अनुकूल व आनंदी, अशा स्त्रीनें युक्त, गर्विष्ठ.
आणि दृढमित्र.
उत्तरा०—नम्र०, धार्मिक, बहुमित्र, कृतज्ञ, सुभाग्य.
श्रव०-श्रीमान्,पंडित,उदार स्त्रीयुक्त, धनी,कांतिमान्.
धनि०—दाता, धनाढ्य, शूर, गीतप्रिय, धनलोभी.
शत०—स्पष्टवक्ता, व्यसनी,शत्रुघाती,साहसी,अवश.
पू०भा०—उद्विग्न, स्त्रीवश,धनिक,निपुण, अदाता,
उत्त०—भाषाचतुर, सुखी, संतानयुक्त, शत्रुजेता,
आणि धार्मिक.
रेव०—संपूर्ण शरीर, सुंदर, शूर, निर्मल, धनवान् .

---

## चंद्रराशिशीलं (जन्मराशीस्व०)

॥ शार्दूलविक्रीडित. ॥

वृत्ताताम्रदृगुष्णशाकलघुभुक्क्षिप्रप्रसादोटनः
कामीदुर्बलजानुरस्थिरधनःशूरोंगनावल्लभः ॥
सेवाज्ञःकुनखीव्रणांकितशिरोमानीसहोत्थाग्रजः
शक्त्यापाणितलेंकितोऽतिचपलस्तोयेचभीरुःक्रिये ॥

अर्थ—मेषराशिस्थ जन्माचें स्वरूप—गोल व आरक्त असे नेत्र, ऊन ऊन, शाकभाज्यांसह अल्प असें भोजन, शीघ्र प्रसन्न, भ्रमणशील, कामी, गुडघ्यांमध्यें दुर्बळ, अस्थिरधन, शूर, स्त्रीप्रिय, सेवाचतुर (खुशामती), न-

खें वाईट, डोक्यास व्रण, गर्विष्ठ, बंधुमुख्य, तळहातावर 'शक्ति' (सूक्ति) तुल्य चिन्ह, अतिचपळ, जलभीरु.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ २

कांत:खेलगति:पृथूरुवदन:पृष्टास्यपार्श्वंकितस्त्यागी
क्लेशसह:प्रभु:ककुदवान्कन्याप्रज:श्लेष्मल:॥पूर्वैर्बं
धुधनात्मजैर्विरहित:सौभाग्ययुक्त:क्षमीदीप्ताग्नि:प्र
मदाप्रिय:स्थिरसुहृन्मध्यांत्यसौख्योगवि ॥

अर्थ—कांतिमान्; खेळत चालणें; मांड्या व मुख विशाळ; पाठ तोंड, पार्श्वभाग यांवर कांहीं चिन्ह; त्यागशील; क्लेशसहनकर्ता; प्रभु; ककुदवान् (प्राधान्य किंवा छत्रचामर युक्त) कन्यासंतति, कफाळू, प्रथमचे धन, बंधु,पुत्रादिकांनीं हीन; भाग्यशाली, क्षमाशील, प्रखरजठराग्नि, स्त्रियांस प्रिय, दृढमित्र, मध्य व अंत्य वयामध्यें सुखी, असें वृषभ राशिस्थ जन्माचें स्वरूप व गुण जाणावे.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ३

स्त्रीलोल:सुरतोपचारकुशलस्ताम्रेक्षण:शास्त्रविद्दूत:
कुंचितमूर्ध्वज:पटुमतिर्हास्येंगितद्यूतवित् ॥ चार्वं
ग:प्रियवाक्प्रभक्षणरुचिर्गीतप्रियोनृत्यवित्क्लीबैर्या
तिरतिंसमुन्नतनसश्चंद्रेतृतीयर्क्षगे ॥

अर्थ—स्त्रियांचा अभिलाषी, रतिसाहित्यकुशल, आरक्तनेत्र, शास्त्रज्ञ, दूत ( जासूद, वकील ), वांकडें

कपाळ, बुद्धिकुशल, हास्य, मर्म व द्यूत यांतें जाणणारा, उत्तमस्वरूप, प्रियवचन, अधिक भोजनाची प्रीति, गीतप्रिय, नृत्यज्ञ, नपुंसकांशीं प्रीति, नाक ऊंच, असें **मिथुनराशिस्थजन्माचें स्वरूप व गुण** जाणावें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ४

**आवक्रद्रुतगःसमुन्नतकटिःस्त्रीनिर्जितःसत्सुहृद्दैव**
**ज्ञःप्रचुरालयःक्षयधनैःसंयुज्यतेचंद्रवत्॥ ऱ्हस्वःपी**
**नगलःसमेतिचवशंसाम्नासुहृद्वत्सलस्तोयोद्यानर**
**तःस्ववेश्मसहितेजातःशशांकेनरः ॥**

**अर्थ**—तिरपें व जलद चालणें, उंचकटी, स्त्रीवश, सुमित्र, दैवज्ञ (ज्योतिषी), पुष्कळ गृहें, धनास चंद्रासारिखी क्षयवृद्धि, ठेंगु, गळा मांसल, प्रीतीनें वश, मित्रवत्सल, पाणी व बगीचे यांची प्रीति, असें **कर्कराशिस्थजन्माचें स्वरूप व गुण** जाणावें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ५

**तीक्ष्णःस्थूलहनुर्विशालवदनःपिंगेक्षणोल्पात्मजः**
**स्त्रीद्वेषीप्रियमांसकाननगःकुप्यत्यकार्येचिरं॥क्षुत्तृ**
**ष्णोदरदंतमानसरुजासंपीडितस्त्यागवान्विक्रांतः**
**स्थिरधीःसुगर्वितमनामातुर्विधेयोर्कभे ॥**

**अर्थ**—उग्र, हनुवटीचा भाग स्थूळ, विशाल मुख, पिंगट नेत्र, अल्प संतति, स्त्रीद्वेष्टा, मांस, वन,

पर्वत यांचे ठायीं प्रीति, अकारणीं सत्वर कोपणारा; क्षुधा, तृषा, उदर, दंत, मन यांच्या, पीडांनीं संतप्त; दाता, पराक्रमी, स्थिरबुद्धि, अभिमानी, मातृभक्त, असें सिंहराशिस्थ जन्माचें स्वरूप व गुण जाणावे.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ६

व्रीडामंथरचारुवीक्षणगतिःस्रस्तांसबाहुःसुखीश्ल
क्ष्णःसत्यरतःकलासुनिपुणःशास्त्रार्थविद्धार्मिकः ॥
मेधावीसुरतप्रियःपरगृहैर्वित्तैश्चसंयुज्यतेकन्यायांप
रदेशगःप्रियवचाःकन्याप्रजोल्पात्मजः ॥

**अर्थ**—सलज्जित पाहाणें व आळसत चालणें, स्कंध व भुजा हीं शिथिल, सुखी, सुकुमार, सत्यशील, कलानिपुण, पंडित, धार्मिक, बुद्धिमान्, रतिप्रिय, परगृह व परधन यांहीं युक्त, विदेशवास, प्रियभाषण, कंन्यासंतति, अल्पपुत्र, असें कन्याराशिस्थ जन्माचें स्वरूप व गुण जाणावे.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ७

देवब्राह्मणसाधुपूजनरतःप्राज्ञःशुचिःस्त्रीजितःप्रां
शुश्चोन्नतनासिकःकृशचलद्गात्रोटनोर्थान्वितः ॥
हीनांगःक्रयविक्रयेषुकुशलोदेवद्विनामासरुग्बंधू
नामुपकारकृद्विरुषितस्त्यक्तःसुतैःसप्तमे ॥

**अर्थ**—देव, ब्राह्मण, साधु यांचे ठायीं पूजनप्रीति; महाज्ञानी, शुचिर्भूत, स्त्रीस वश, अति उंचशरीर व

अति उंच नासिका, अवयव कृश व असमर्थ, फिरणारा, सधन, व्यंग, देवघेवीमध्यें कुशळ, देवाचें एक व सभ्य एक अशीं दोन नांवें ज्यास, रोगिष्ठ, बंधूंवर उपकार कर्ता, परंतु त्यांणीं निर्भर्त्सना करून टाकलेला, असें तूळराशिस्थजन्माचें स्वरूप व गुण जाणावे.

॥ मालिनी ॥ ८

पृथुलनयनवक्षावृत्तजंघोरुजानुर्जनकगुरुवियुक्तः
शैशवेव्याधितश्च ॥ नरपतिकुलपूज्यःपिंगलःक्रूर
चेष्टोझषकुलिशखगांकच्छन्नपापोऽलिजातः ॥

**अर्थ**—वक्षस्थळ व नयन हीं विशाळ,मांड्या, पोटऱ्या व गुडघे हीं गोंडाळ, पिता, माता व गुरू यांपासून वेगळा, बाळपणीं रोगी, राजकुळांस पूज्य, पिंगट, क्रूरस्वभावी, मच्छ, वज्र, पक्षी अशीं चिन्हें असलेला, गुप्तपापरत, असें वृश्चिकराशिस्थ जन्माचें स्वरूप व गुण जाणावे.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ९

व्यादीर्घास्यशिरोधरःपितृधनस्त्यागीकविर्वीर्यवान्व
क्तास्थूलरदश्रवाधरनसः कर्मोद्यतःशिल्पवित् ॥
कुब्जांसःकुनखीसमांसलभुजःप्रागल्भ्यवान्धर्मविद्
धुद्विट्नबलात्समेतिचवशंसाम्नैकसाध्योश्वजः ॥

**अर्थ**—मुख, ग्रीवा, हे अत्यंत दीर्घ, (लांबोळे किं० स्थूळ) पितृद्रव्यप्राप्ति, उदार, कवि, बळवान्, भाषणचतुर, दंत, कर्ण, ओष्ठ, नाक हीं सर्वच मोठा-

लीं; कर्मशीळ, शिल्पज्ञ, खांदे अस्पष्ट, नखें वाईट, पुष्ट भुजा, अत्यंत तेजस्वी, धर्मज्ञ, बंधुद्वेष्टा, बळात्कारें अवश, सामोपचारानें वश, असें **धनराशिस्थजन्माचें स्वरूप व गुण** जाणावे.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १०

**नित्यंलालयतिस्वदारतनयान्धर्मध्वजोधः कृशःस्व क्षःक्षामकटीगृहीतवचनःसौभाग्ययुक्तोलसः॥ शी तालुर्मनुजोटनश्चमकरेसत्वाधिकःकाव्यकृल्लुब्धोग म्यजरांगनासुनिरतःसंत्यक्तलज्जोऽघृणः ॥**

**अर्थ**—स्वस्त्री व पुत्रादिकांचे नेहेमी कोड पुरविणारा, धर्मध्वज, शरीराच्या खालचा भाग कृश, नेत्र उत्तम, कमर सूक्ष्म, वचन पाळणारा, भाग्यशाली, आळशी, शैत्ययुक्त, फिरणारा, सत्वगुणाधिक्य, काव्यकर्ता, लोभी, अगमनीय व वृद्ध अशा स्त्रीशीं आसक्त, असें **मकरराशिस्थ जन्माचे स्वरूप व गुण** जाणावे.

॥ त्रोटक ॥ ११

**करभगलःशिरालुःखरलोमशदीर्घतनुःपृथुचरणोरु पृष्ठजघनास्यकटिर्जरठः॥ परवनितार्थपापनिरतः क्षयवृद्धियुतःप्रियकुसुमानुलेपनसुहृद्घटजोध्वसः ॥**

**अर्थ**—मान उंटासारिखी पुढें आलेली, शिरा विशेष, केश कठोर, उंच शरीर; पाय, पोटऱ्या, मांड्या, पाठ, मुख, कमर, पोट, हीं विस्तीर्ण; परस्त्री व परधनासक्त व पापरत, क्षयवृद्धि पावणारा, उटणीं व पुष्पें

यांवर प्रीति, सुमित्र, मार्गश्रम सोसणारा, असें कुंभ राशीचें स्वरूप व गुण जाणावे.

॥ मालिनी ॥ १२

जलपरधनभोक्तादारवासोनुरक्तःसमरुचिरश रीरस्तुंगनासोबृहत्कः ॥ अभिभवतिसपत्नान् स्त्रीजितश्चारुदृष्टिर्द्युतिनिधिधनभोगीपंडितश्चां त्यराशौ ॥

अर्थ—जलधन, व परधन भोक्ता, स्त्री व वस्त्रें यांत निमग्न, गोंडस व सुंदर असें शरीर, नाक उंच, कपाळ विस्तीर्ण, शत्रूंस पराजित करणारा, स्त्रीवश, सुंदर नयन, कांतिमान्, निधि (गुप्त) धन भोगणारा, आणि ज्ञानी असें मीन राशिस्थ जन्माचें स्वरूप व गुण जाणावे.

॥ भ्रमरविलसित ॥ १३

बलवतिराशौतदधिपतौचस्वबलयुतःस्याद्यदितु हिनांशुः॥कथितफलानामविकलदाताशाशिवद तोन्येत्यनुपरिचिंत्याः ॥

अर्थ—राशि बलवान् असून तिचा स्वामीहि बलवान् आणि चंद्रही बलवान् असे तिघेही बलवान् असतील तर वर सांगितलेलीं सर्व फळें होतील. अन्यथा असल्यास चंद्राचे गुणांप्रमाणें ; ( कमीजास्त ) याच प्रकारें यापुढें सांगण्याचीं जीं ग्रहफळें त्यांविषयींहि जाणावें.

---

## ॥ अथसूर्यराशिस्वरूपं ॥

॥ औपच्छंदसिका ॥ १

प्रथितश्चतुरोटनोल्पवित्तःक्रियगेत्वायुधभृद्वितुं गभागे॥ गविवस्त्रसुगंधपण्यजीवीवनिताद्विट्कुशलश्चगेयवाद्ये ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥ २

विद्याज्योतिषवित्तवान्मिथुनगेभानौकुलीरेस्थितेतीक्ष्णोऽस्वःपरकार्यकृच्छ्रमपथक्लेशैश्चसंयुज्यते ॥ सिंहस्थेवनशैलगोकुलरतिर्वीर्यान्वितोज्ञः पुमान् कन्यास्थेलिपिलेख्यकाव्यगणितज्ञानान्वितःस्त्री वपुः ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ३

जातस्तौलिनिशौंडिकोध्वनिरतोहैरण्यकोनीचकृत्क्रूरःसाहसिकोविषार्जितधनःशस्त्रांतगोऽलिस्थिते॥सत्पूज्योधनवान्धनुर्धरगतेतीक्ष्णोभिषक्कारुकोनीचोज्ञः कुवणिक्मृगेऽल्पधनवांल्लुब्धोन्यभाग्येरतः ॥

॥ वसंततिलका ॥ ४

नीचोघटेतनयभाग्यपरिच्युतोऽस्वस्तोयोत्थपण्यविभवोवनिताहृतोंत्ये॥नक्षत्रमानवतनुःप्रतिमेविभागेलक्ष्मादिशेत्तुहिनरश्मिदिनेशयुक्ते ॥

अर्थ—सूर्य द्वादशराशिस्थित फळें.

मेष–प्रख्यात, चतुर, हिंडणारा, अल्पद्रव्य, शस्त्रधारी,–सूर्य परमोच्च असतां हीं फळें अति उत्तम असें जाणावें.

वृष–वस्त्रें, सुगंधी द्रव्यें, यांच्या विक्रयानें जीवन; स्त्रियांचा द्वेष्टा, गीतवाद्यकुशल.

मिथु–विद्वान्, ज्योतिषी, धनवान्.

कर्क–तामसी, निर्धन, परकार्यतत्पर, श्रम, मार्ग, क्लेश यांहीं युक्त.

सिंह–अरण्य, पर्वत, गुरांचे कळप, या स्थळीं प्रीति; बळिष्ठ, अज्ञ.

कन्या–लिहिणें, चित्रें, कवित्व, गणित, यांत कुशळ, स्त्रीसदृशदेह.

तूळ–मद्यकार, सुवर्णकार, हिंडणारा, अनुचितकर्मा.

वृश्चि–क्रूर, साहसी, विषार्जितधनी, शस्त्रपरीक्षक.

धन–श्रेष्ठांस पूज्य, धनवान्, तीव्र, वैद्य, शिल्पज्ञाता.

मकर–नीच, अज्ञ, दुर्व्यापार, अल्पद्रव्य, लोभी, परभाग्यासक्त.

कुंभ–नीच, पुत्र व भाग्य हीं नष्ट, निर्धन.

मीन–जलोत्पन्न पदार्थविक्रयानें संपन्न, स्त्रियांस पूज्य.

(राशिचक्राचे कालांगावर जेथें सूर्य व चंद्र असतील तेथें लक्ष्म (चिन्ह) सांगावें.)

## मंगळराशिस्वरूप.

॥ त्रोटक ॥ ९

नरपतिसत्कृतोटनश्चमूपवणिक्सधनाःक्षततनु

श्चौरभूरिविषयांश्चकुजःस्वगृहे ॥ युवतिजिता
न्सुहृत्सुविषमान्परदाररतान्कुहकसुवेषभीरु
परुषान्सितभेजनयेत् ॥

॥ वसंततिलका ॥ ६

बौधेसहस्तनयवान्विसुहृत्कृतज्ञोगांधर्वयुद्धकुश
लःकृपणोभयोर्थी ॥ चांद्रेर्थवान्सलिलयानसम
र्जितस्वःप्राज्ञश्चभूमितनयेविकलःखलश्च ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ७

निस्वःक्लेशसहोवनांतरचरःसिंहेल्पदारात्मजोजै
वेनैकरिपुर्नरेंद्रसचिवः ख्यातोभयोल्पात्मजः ॥
दुःखार्तोविधनोऽटनोनृतरतस्तीक्ष्णश्चकुंभस्थिते
भौमेभूरिधनात्मजोमृगगतेभूपोथवातत्समः ॥

अर्थ—मंगळ द्वादशराशिस्थित फळें.

स्वगृहीं—राजपूज्य, भ्रमणशील, सेनाधिप, वणिक्, सध-
न, शरीरव्रणांकित, चौर, अनेकविषय.

शुक्रगृहीं—स्त्रीवश, मित्राशीं विषम, परदारासक्त, इंद्र-
जाली (गारुडी), सुवेष, भीरु, कर्कश.

बुधगृहीं—तेजस्वी, पुत्रवान्, मित्रवर्ज्य, परोपकारी, गीत,
वाद्य, युद्ध, या कळांमध्यें कुशळ; कृपण,
निर्भय, याचक.

चंद्रगृहीं—द्रव्यवान्, नौकेनें द्रव्य संपादन, शाहाणा,
व्यंग, व खष्ट, असा.

सिंहेस-निर्धन, क्लेश सोसणारा, अरण्यवासी, स्त्रीपुत्र हे अल्प.

गुरुगृहीं—बहुशत्रु, राजमंत्री, विख्यात, निर्भय, अल्पपुत्र.
मकरेस—बहुधन; पुत्रयुक्त, राजा किं० राजतुल्य.
कुंभेस—दु:खी, दरिद्री, भ्रमणशील, असत्यवचन, तामसी.

## ॥ बुधराशिस्वरूपं ॥

॥ वसंततिलका ॥ ८

धूर्तर्णपानरतनास्तिकचौरनिस्वा:कुस्त्रीककूटकृदसत्यरत:कुजर्क्षे ॥ आचार्यभूरिसुतदारधनार्जनेष्टा:शौक्रेवदान्यगुरुभक्तिरताश्चसौम्ये ॥

॥ उपेंद्रवज्रा ॥ ९

विकत्थन:शास्त्रकलाविदग्ध:प्रियंवद:सौख्यरतस्तृतीये ॥ जलार्जितस्व:स्वजनस्यशत्रु:शशांकजेशीतकरर्क्षयुक्ते ॥

॥ प्रहर्षिणी ॥ १०

स्त्रीद्वेष्योविधनसुखात्मजोऽटनोज्ञ:स्त्रीलोल:स्वपरिभवोर्कराशिगेज्ञे ॥ त्यागीज्ञ:प्रचुरगुण:सुखीक्षमावान्युक्तिज्ञोविगतभयश्चषष्ठराशौ ॥

॥ औपच्छंदसिका ॥ ११

परकर्मकृदस्व:शिल्पबुद्धिर्ऋणवान्विष्टिकरोबुधेर्कजर्क्षे ॥ नृपसत्कृतपंडिताप्तवाक्योनवमेंत्येजितसेवकोंत्यशिल्प: ॥

अर्थ—बुध द्वादशराशि स्थित फळें.

मंगळगृहीं–जुगार, कर्ज, मद्यपान यांत निमग्न; नास्तिक, चोर, निर्धन, दुष्ट स्त्री, कपटी, असत्यवचनी.
शुक्रगृहीं– गुरुश्रेष्ठ ; पुत्र, स्त्री, धनार्जन, हीं बहुत, दाता, व गुरुभक्तिपरायण.
मिथुनेस–वाचाळ, शास्त्रकलाप्रवीण, सुखासक्त, प्रियभाषणी.
कर्केस–जलापासून द्रव्योपार्जन, स्वजनाचा वैरी.
सिंहेस–स्त्रीद्वेष्टा; धन, पुत्र, सुख यांहीं हीन, भ्रमणशील, मूर्ख, स्त्रियाभिलाषी, स्वजनापासून अनादर.
कन्येस–उदार, ज्ञानी, बहुगुणी, सुखी, क्षमावान्, युक्तिवान्, निर्भय.
शनिगृहीं–परकीय कार्यें करणारा, निर्धन, शिल्पबुद्धि, ऋणी, आज्ञा करणारा.
धनेस–राजपूज्य, पंडित, युक्तवचन (हजरजबाबी).
मीनेस–सेवाकुशल, अत्यंत शिल्पकुशळ.

## गुरुराशिस्वरूपं

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १२

सेनानीबहुवित्तदारतनयौदातासुभृत्यः क्षमीतेजो
दारगुणान्वितःसुरगुरौख्यातःपुमान्कौजभे ॥ कल्पां
गःसधनार्थमित्रतनयस्त्यागीप्रियःशौक्रभेबौधेभूरि
परिच्छदात्मजसुहृत्साचिव्ययुक्तःसुखी ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १३

चांद्रेरत्नसुतस्वदारविभवप्रज्ञासुखैरन्वितः सिं
हेस्याद्बलनायकःसुरगुरौप्रोक्तंचयच्चंद्रभे ॥

स्वर्क्षे मांडलिकोनरेंद्रसचिवःसेनापतिर्वाधनीकुंभेक
र्कटवत्फलानिमकरेनीचोल्पवित्तोऽसुखी ॥

अर्थ—गुरु द्वादशराशि स्थित फळें.

मंगळगृहीं—सेनापति; धन, स्त्री, पुत्र हीं बहुत; उदार, उत्तम सेवक, क्षमाशीळ, तेजस्वी, स्त्रीसौख्य, विख्यात.

शुक्रगृहीं— दृढशरीर; धन, अर्थ, मित्र, पुत्र, यांहीं युक्त; उदार, प्रिय.

बुधगृहीं— आच्छादकवस्त्रें ( कनाती, चांदण्या, इ० ); बहु पुत्र, बहु मित्र, सचिवपणा, आणि सुखी.

कर्केस-रत्नें, संतति, धन, स्त्री, वैभव, ज्ञान, सुख, यांहीं युक्त.

सिंहेस—सैन्यपति, (बाकी सर्व कर्कवत् म्ह० वरप्रमाणें)

मकरेस—नीच, अल्पधन, व असुखी.

कुंभेस—कर्केस सांगितल्याप्रमाणें.

स्वगृहीं—मांडलिक, राजमंत्री, सेनापति, किं० धनवान्.

## ॥ शुक्रराशिस्वरूपं ॥

॥ पुष्पिताग्रा ॥ १४

परयुवतिरतस्तदर्थवादैर्हृतविभवःकुलपांसनःकु
जर्क्षे ॥ स्वबलमतिधनोनरेंद्रपूज्यःस्वजनविभुः
प्रथितोभयः सितेस्वे ॥

॥ औपच्छंदसिका ॥ १५

नृपकृत्यकरोर्थवान्कलाविन्मिथुनेषष्ठगतेतिनीच
कर्मा ॥ रविजर्क्षगतेऽमरारिपूज्येसुभगःस्त्रीवि
जितोरतःकुनार्याम् ॥

॥ शिखरिणी ॥ १६

द्विभार्योर्थीभीरुः प्रबलमदशोकश्चशशिभेहरौयोषाप्ता
र्थःप्रवरयुवतिर्मंदतनयः ॥ गुणैःपूज्यःसस्वस्तुरगसहि
तेदानवगुरौझषेविद्वानाढ्योनृपजनितपूजोतिसुभगः ॥

अर्थ--शुक्र द्वादश राशिस्थित फळें.

मंगळगृहीं—परदारासक्त, त्यास्तव वैभवाचा नाश, आणि
कुलास हीनत्व.

स्वगृहीं—स्वबळानें व स्वबुद्धीनें धनार्जन, राजपूज्य, स्वज-
नप्रमुख, प्रख्यात, निर्भय.

मिथुनेस—राजकार्य करणारा, धनवान्, कलानिपुण.

कन्येस—अतिनीच कर्म कर्ता.

शनिगृहीं—स्वरूपवान्, स्त्रीवश, कुस्त्रियांशीं रत.

कर्केस—द्विभार्य, याचक, भीरु, अतिगर्वी, अतिदुःखी.

सिंहेस—स्त्रीकडून धन प्राप्त, स्त्रीप्राबल्य, अल्पपुत्र.

धनेस—सर्वमान्य, सधन.

मीनेस—विद्वान्, धनाढ्य, राजपूज्य, अतिप्रिय.

## शनिराशिस्वरूपं

॥ मंदाक्रांता ॥ १७

मूर्खोटनःकपटवान्विसुहृद्यमेजेकीटेतुवंधवधभाक्
चपलोऽघृणश्च ॥ निर्ह्रीसुखार्थतनयःस्खलितश्च
लेख्येरक्षापतिर्भवतिमुख्यपतिश्चबौधे ॥

॥ मंदाक्रांता ॥ १८

वर्ज्यस्त्रीष्टोनबहुविभवोभूरिभार्योवृषस्थेख्यातः
स्वोच्चेगणपुरबलग्रामपूज्योर्थवांश्च ॥ कर्किण्य
स्वोविकलदशनोमातृहीनोऽसुतोज्ञःसिंहेनार्यो
विसुखतनयोविष्टिकृत्सूर्यपुत्रे ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १९ ॥

स्वंतः प्रत्ययितोनरेंद्रभवनेसत्पुत्रजायाधनोजीव
क्षेत्रगतेर्कजेपुरबलग्रामाग्रनेताथवा ॥ अन्यस्त्रीधन
संवृतःपुरबलग्रामाग्रणीर्मंदहृक्स्वक्षेत्रेमलिनःस्थि
रार्थविभवोभोक्ताचजातःपुमान् ॥

अर्थ—शनिद्वादशराशिस्थित फळें.

मेषेस—मूर्ख, भ्रमणशील, कपटी, मित्रहीन.

वृश्चिकेस—वधबंधनशील, चपल, निर्दय.

बुधगृहीं—लज्जा, सुख, धन, पुत्र, यांहींकरून हीन; लिहितांना मध्यें गुंतणारा; रक्षणकर्ता, मुख्यांचा मुख्य.

वृषभेस—अगम्य स्त्रियांचा इष्ट, अल्पवैभव, बहुभार्य.

तुळेस— विख्यात; मंडळी, नगर, ग्राम, यांमध्यें श्रेष्ठ; व द्रव्यवान्.

कर्केस— दरिद्री, विकलदंत, पुत्रमातृहीन, अज्ञ.

सिंहेस— असज्जन, सुखहीन, पुत्रहीन, विष्टिकर्ता (ओझीं वाहणारा).

गुरुगृहीं– अंतकाळीं शुभ, राजगृहीं विश्वासु; पुत्र,स्त्री, धन, हीं उत्तम; नगर, सैन्य, ग्राम, यांच्या मुख्यांचा मुख्य.

स्वगृहीं– परधन, परस्त्री यांहींसंयुक्त; पुर, बल, ग्राम यांचा मुख्य; मंददृष्टि, मलिन, स्थिरधन, स्थिरवैभव, भोक्ता (असंचयशील).

॥ पुष्पिताग्रा ॥ २०

**शिशिरकरसमागमेक्षणानांसदृशफलंप्रवदंति**
**लग्नजातम् ॥ फलमधिकमिदंयदत्रभावान्भवनभ**
**नाथगुणैर्विचिंतनीयाः ॥**

**अर्थ**—चंद्रयुक्त राशीच्या(श्लो० १ते१३)व चंद्रदृष्टींच्या (पुढील अध्याय)फळासारिखींच लग्नयुक्त राशींचीं हीं फळें घेण्यास पूर्व मुनि विशेषत्वेंकरून सांगतात.—आणि कोणत्याही स्थानापासून त्याचा स्वामी ज्या भावीं(स्थानीं) असेल, त्या भावाचें व त्याचे स्वामीचे गुणाप्रमाणें (बळाप्रमाणें) त्यांचे फळांची योजना करावी. (पुष्टि किं० हानि) हें इतकें मात्र अधिक आहे.

॥ राशिशीलाध्याय संपूर्ण ॥ १७

## ॥ दृष्टिफलाध्यायः ॥ १८

( चंद्रावर अन्य ग्रहांच्या दृष्टीचीं फळें )



॥ शार्दूलविक्रीडित ॥ १, २, ३,

**चंद्रेभूपबुधौनृपोपमगुणीस्तेनोधनश्चाजगेनिःस्वःस्ते**
**ननृमान्यभूपधनिनःप्रेष्यःकुजाद्यैर्गते ॥ नृस्थेयोन्य**

वहारिपार्थिवबुधाभीस्तंतुवायोधनीस्वर्क्षेयोद्धृकवि
ज्ञभूमिपतयोऽयोजीविदृग्रोगिणौ ॥ १ ॥ ज्योतिर्ज्ञा
ढ्यनरेंद्रनापितनृपक्ष्मेशाबुधाद्यैर्हरौतद्वद्भूपचमूपनै
पुणयुताःषष्ठेशुभेस्त्र्याश्रयः॥नृकेभूपसुवर्णकारवणि
जःशेषैक्षितेनैकृतीकीटेयुग्मपितानतश्चरजकोव्यंगो
धनोभूपतिः ॥ २ ॥ ज्ञात्युर्वीशजनाश्रयश्चतुरगेपा
पैःसदंभःशठश्चात्युर्वीशनेंरद्रपंडितधनीद्रव्योनभूपो
मृगे ॥ भूपोभूपसमोन्यदारनिरतः शेषैश्चकुंभास्थि
तेहास्यज्ञोनृपतिर्बुधश्चझषगेपापश्चपापेक्षिते ॥ ३ ॥

अर्थ—चंद्र हा, मेषादि बारा राशींस असतां त्यावर मंगळादि ग्रहांच्या दृष्टींचीं फळें अनुक्रमानें कोष्टकांत खालीं दाखविलीं आहेत.

| राशि. | मंगल. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. | सूर्य. |
|---|---|---|---|---|---|---|
| मेष– | भूप, | पंडित | राजतुल्य | गुणी | चौर | निर्धन. |
| वृष– | निर्धन | चौर | नृपूज्य | भूप | धनिक | दास. |
| मिथु– | शस्त्रवि० | राजा | पंडित | निर्भय | कोष्टी | निर्धन |
| कर्क– | योद्धा | कवि | ज्ञानी | भूपति | शस्त्रजीवी | नेत्ररोगी |
| सिंह– | भूपति | ज्योतिषी | धनाढ्य | नरेंद्र | नापित | राजा |
| कन्या– | स्त्रियाश्र. | भूप | सेनापति | नैपुण्य | स्त्रियाश्रय | स्त्रियाश्रय |
| तुळ– | नीचकृती | भूप | सुवर्णकार | वणिक | नीचकृति | नीचकृति |
| वृश्चि– | भूपति | युग्मपिता | नम्र | रंगकार | व्यंग | निर्धन |
| धन– | दंभी शठ, | ज्ञातिश्रेष्ठ | भूमिपती | जनाश्रय | दंभी शठ | दंभी शठ |
| मकर– | भूप | राजाधिराज | राजा | पंडित | धनवान्· | निर्धन |
| कुंभ– | परदार. | भूप | राजतुल्य | परदार | परदार | परदार० |
| मीन– | पापी | हसका | राजा | पंडित | पापी | पापी, |

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ४

होरेशर्क्षदलाश्रितैःशुभकरोदृष्टः शशीतद्गत
र्क्ष्यंशेतत्पतिभिःसुहृद्भवनगैर्वावीक्षितःशस्यते ॥
यत्प्रोक्तंप्रतिराशिवीक्षणफलंतद्द्वादशांशेस्मृतं
सूर्याद्यैरवलोकितेपिशशिनिज्ञेयंनवांशेष्वतः ॥

**अर्थ**—लग्नाच्या दोन होरा; त्यांचे स्वामी सूर्य चंद्र असतात. यास्तव चंद्र हा ज्या स्वामीच्या होरेस असेल त्या स्वामीच्याच होरेंत असणारे ग्रहांची दृष्टि जर त्या चंद्रावर असेल,तर शुभ होय.—तसेच द्रेष्काणादिक स्वामींच्या दृष्टीचींही फळें जाणावीं.——मित्रगृहीं असलेल्या ग्रहांची दृष्टि असतां पण शुभ होय.—जीं प्रत्येक राशीच्या ग्रहांचीं दृष्टिफळें वर सांगितलीं तींच चंद्र ज्या द्वादशांशीं असेल त्यासही योजावीं.—तसेंच नवमांशाविषयीं पण सूर्यादिकांचीं दृष्टिफळें घ्यावीं.

॥ वसंततिलका ॥ ५, ६, ७, ८

आरक्षिकोवधरुचिःकुशलोनियुद्धेभूपोर्थवान्क
लहकृत्क्षितिजांशसंस्थे ॥ मूर्खोस्यदारनिरतःसु
कविःसितांशेसत्काव्यकृत्सुखपरोन्यकलत्रग
श्च ॥ ५ ॥ बौधेहिरंगचरचौरकवींद्रमंत्रीगेयज्ञ
शिल्पनिपुणःशशिनिस्थितेंशे॥स्वांशेल्पगात्रधनलु
ब्धतपस्विमुख्यःस्त्रीपोष्यकृत्यनिरतश्चनिरीक्ष्यमा
णे ॥ ६ ॥प्रहर्षिणी ॥ सक्रोधोनरपतिसंमतोनि

धीशःसिंहांशेप्रभुरसुतोतिहिंस्त्रकर्मा ॥ जीवांशे प्रथितबलोरणोपदेष्टाहास्यज्ञःसचिवविकामवृद्ध शीलः ॥ ७ ॥ शालिनी ॥ अल्पापत्योदुःखितःस त्यपिस्वेमानासक्तःकर्मणिस्वेनुरक्तः ॥दुष्टःस्त्रीष्टः कृपणश्चार्किभागेचंद्रेभानौतद्वादिंद्वादिदृष्टे ॥ ८ ॥

अर्थ—चंद्र हा ज्या ज्या ग्रहांच्या नवमांशीं असेल त्या-वर ग्रहांच्या दृष्टीचीं फळें कोष्टक.

| नवमां०— | सूर्य. | मंग. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. |
|---|---|---|---|---|---|---|
| मंगळ— | रक्षक | हिंसक | युद्धकुश. | भूप | धनवान् | कलही. |
| शुक्र— | मूर्ख | परदार, | श्रेष्ठ, कवि. | सत्काव्य, | सुखासक्त. | परदारी. |
| बुध.— | मल्ल | तस्कर | कविराज | मंत्री | गीतज्ञ | शिल्पनिपु. |
| चंद्र.— | अल्प. | धनलोभी | तपस्वी | मुख्य | स्त्रीपोष्य | कार्यासक्त. |
| सूर्य.— | क्रोधी | राजप्रिय | निधीश | प्रभु | अपुत्र | अतिहिंसक |
| गुरु.— | * | + | हास्यज्ञ | मंत्री | कामहीन. | वृद्धशील. |
| शनि.— | † | + | अभिमानी | स्वकर्म. | कु,स्त्रीप्रिय. | कृपण. |

चंद्रावर जशीं सूर्यादिकांचीं दृष्टिफळें तशींच सूर्या-वरही चंद्रादिकदृष्टीचीं फळें घ्यावीं.

॥ वसंततिलका ॥ ९

वर्गोत्तमस्वपरगेषुशुभंयदुक्तंतत्पुष्टमध्यलघुताशु भमुत्क्रमेण ॥ वीर्यान्वितोंशकपतिर्निरुणाद्धिपू र्वंराशीक्षणस्यफलमंशफलंददाति ॥

अर्थ—चंद्र हा, राशीच्या वर्गोत्तमांशीं, स्वनवमांशीं, आणि परनवमांशीं असेल तर; जें शुभ दृष्टिफळ तें उत्तम, म-

* विख्यात बळ. † युद्धाशिक्षक + अल्पपुत्र + धन असूनही दुःखी.

ध्यम, कनिष्ठ, या क्रमानें होईल.—अशुभ दृष्टिफल जें, तें उलटे क्रमानें जाणावें. चंद्र ज्या नवमांशीं असेल त्याचा स्वामी जर बळवान् असेल तर प्रथमपासूनच फळदायक. तो नवमांशपति बळवान् नसेल तर राशिस्वामीचेंच दृष्टिफळ चंद्रमा देतो.

---

॥ दृष्टिफलाध्यायसंपूर्ण ॥

## ॥ भावफलाध्यायः ॥ १८



( तन्वादि द्वादशस्थानस्थित ग्रहांचीं फळें )

॥ मंदाक्रांता ॥ १,२,३

शूरस्तब्धोविकलनयनोनिर्घृणोर्केतनुस्थेमेषेसस्वस्तिमि रनयनःसिंहसंस्थेनिशांधः।।नीचेऽधोऽस्वःशशिगृहगतेबुद्बुदाक्षः पतंगेभूरिद्रव्योनृपहृतधनोवक्त्ररोगी द्वितीये ॥ १ ॥ औपच्छंदसिका ॥ मतिविक्रमवान्तृतीयगेऽर्केविसुखःपीडितमानसश्चतुर्थे ॥ असुतोधनवर्जितस्त्रिकोणेबलवान्शत्रुजितश्चशत्रुयाते ॥ २ ॥ वसंततिलका ॥ स्त्रीभिर्गतःपरिभवोमदगेपतंगेस्वल्पात्मजोनिधनगेविकलेक्षणश्च ॥ धर्मेसुतार्थसुखभाक्सुखशौर्यभाक्खेलाभेप्रभूतधनवान्पतितस्तुरिःफे ॥ ३ ॥

अर्थ—सूर्य तन्वादिद्वादशस्थानीं असतां त्याचीं फळें. तनु—शूर, चिरकारी, नेत्रपीडित, निर्दय;—मेषेस असतां धनवान्, नेत्ररोगी; सिंहेस अ०—निशांध, नीच

अ० (तूळ)—अंध, निर्धन, कर्केस अ० बुद्धदाक्ष.

धन—विपुलधन, राजकारणानें धनहरण, मुखरोगी.

| | |
|---|---|
| सहज—बुद्धिमान्, पराक्रमी. | मृत्यु—अल्पसंतति, नेत्रपी० |
| सुख-सुखहीन, मानसीपीडा. | धर्म—पुत्र व धन यांहीं युक्त. |
| सुत—अपुत्र, धनहीन. | कर्म—सुख व शौर्य यांहीं युक्त. |
| शत्रु—बलवान्, शत्रुजित. | आय—विपुल धन. |
| जाया—स्त्रीकडून अनादर. | व्यय—पतित, स्वकर्मभ्रष्ट. |

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ४, ५,

मूकोन्मत्तजडांधहीनबधिरप्रेष्याःशशांकोदये
स्वर्क्षाजोच्चगतेधनीबहुसुतःसस्वःकुटुंबीधने॥
हिंस्रोभ्रातृगतेसुखेसतनयस्तत्प्रोक्तभावान्वितोनै
कारिर्मृदुकायवन्हिमदनस्तीक्ष्णोलसश्चारिगे॥४
ईर्ष्युस्तीव्रमदोमदेबहुमतिर्व्याध्यर्दितश्चाष्टमेसौभा
ग्यात्मजमित्रबंधुधनभाक्धर्मस्थितेशीतगौ ॥
निष्पत्तिसमुपैतिधर्मधनधीशौर्यैर्युतःकर्मगेख्या
तोभावगुणान्वितोभवगतेक्षुद्रोंगहीनोव्यये ॥ ५ ॥

अर्थ—चंद्र द्वादशस्थानस्थित फळें—

लग्न—मूक, उन्मत्त, जड, अंध, बधिर, नीच, दास;—
कर्केस असतां;—धनवान्, मेषेस अ०—बहुपुत्र,
वृषभेस अ०— धनवान्.

| | |
|---|---|
| द्वितीय—कुटुंबवान्. | पंचम—बुद्धि, संतानयुक्त. |
| तृतीय—क्रूर. | सप्तम—ईर्षायुक्त, अतिकामी. |
| चतु०—संतानयुक्त. | अष्टम—बहुमति, रोगग्रस्त. |

षष्ठ—अनेकशत्रु, सकुमार, मंदाग्नि, अल्पमैथुन, उग्रस्व.
नवम—शोभायमान; पुत्र, मित्र, बंधु, धन यांहीं युक्त.
दशम—यशस्वी; धर्म, बुद्धि, शौर्य यांहीं युक्त.
लाभ—स्थान गुणाप्रमाणें उत्तम प्राप्ति.
व्यय—क्षुद्र, अवयवहीन.

॥ वसंततिलका ॥ ६

लग्नेकुजेक्षततनुर्धनगेकुदन्नोधर्मेऽघवान्दिनकर
प्रतिमोन्यसंस्थः ॥ विद्वान्धनीप्रखलपंडितमं
त्र्यशत्रुर्धर्मज्ञविश्रुतगुणःपरतोर्कवज्ज्ञे ॥

अर्थ—मंगळ द्वादशस्थानफळें. बुध द्वादशस्थान फ०.

| | | |
|---|---|---|
| लग्न—शरीरावर व्रणें. | लग्नीं—विद्वान् | पं०—मंत्री. |
| धन—कुभोजन. | द्वि०—धनिक | ष०—अशत्रु. |
| नवम—पापरत. | तृ०—अतिदुष्ट | स०—धर्मज्ञ. |
| राहिलीं स्थानें सूर्यवत्. | च०—पंडित. | अ०—गुणप्र. |

राहिलीं स्थानें सूर्यवत् घ्यावीं.

॥ इंद्रवज्रा ॥ ७

विद्वान्सुवाक्यःकृपणःसुखीचधीमानशत्रुःपितृतो
धिकश्च ॥ नीचस्तपस्वीसधनःसलाभःखलश्चजी
वेक्रमशोविलग्नात् ॥

अर्थ—गुरु द्वादशभाव फळें.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| लग्नीं. | द्विती. | तृती. | चतु. | पंचम. | षष्ठ. |
| विद्वान्, | सुवाक्य, | कृपण, | सुखी, | बुद्धिमान्, | अशत्रु. |
| सप्तम. | अष्ट. | नव. | दश. | एका. | द्वाद. |
| बापसवाई, | नीच, | तपस्वी, | सधन, | लाभवान्, | दुर्जन. |

॥ चित्रता ॥ ८

स्मरनिपुणः सुखितश्चविलग्नेप्रियकलहोऽस्तगते सुरतेप्सुः॥तनयगतेसुखितोभृगुपुत्रेगुरुवदतोन्यदृझषेद्रविणीस्यात् ॥

अर्थ—शुक्रद्वादशभावफळें—लग्न—रतिकुशळ, सुखी. सप्त—कलहप्रिय, सुरतेच्छु. पंचम—सुखी. राहिलेलीं स्थानफळें गुरूप्रमाणें घ्यावीं—**मीनेचा शुक्र** कोणतेही स्थानीं असतां धनाढ्य.

॥ शिखरिणी ॥ ९

अदृष्टार्थोरोगीमदनवशगोत्यंतमलिनःशिशुत्वेपीडार्तःसवितृसुतलग्नेत्यलसवाक् ॥ गुरुस्वर्क्षोच्चस्थेनृपतिसदृशोग्रामपुरपःसुविद्वांश्चार्वंगोदिनकरसमोन्यत्रकथितः ॥

अर्थ—शनि द्वादशभाव फळें:—लग्नीं—निर्धन, रोगी, कामवश, अतिमलिन, बाळपणीं व्याधिग्रस्त, गेङणें बोलणारा;—गुरुगृहीं, स्वगृहीं, उच्चस्थ, असा शनि असतां;—राजतुल्य, ग्रामपुराधिप, पंडित, सुकुमारशरीर असें जाणावें;— आणि राहिलीं स्थानें सूर्यवत् घ्यावीं.

॥ मालिनी ॥ १०

सुहृदरिपरकीयस्वर्क्षतुंगस्थितानांफलमनुपरिचिंत्यंलग्नदेहादिभावैः ॥ समुपचयविपत्तीसौम्यपापेषुसत्यःकथयतिविपरीतंरिःफषष्ठाष्टमेषु ॥

**अर्थ**—लग्न हें तनु धरून पुढें कुटुंब, सहज इ० अशा द्वादशभावीं (स्थानीं) मित्र, शत्रु, पर, स्व, उच्च, अशा राशीस असलेल्या ग्रहांचीं फळें तत्सदृश जाणावीं.— सौम्य ग्रह हे स्थानवृद्धि (भाववृद्धि) करतात, व पापग्रह हे स्थानहानि (विपत्ति) करितात.—तेच षष्ठ, अष्ट, द्वादश, या स्थानीं सौम्य ग्रह हे स्थानहानि करितात, व पापग्रह हे स्थानवृद्धि करितात, असें सत्याचार्य सांगतात.

॥ अनुष्टुप् ॥ ११

**उच्चत्रिकोणस्वसुहृच्छत्रुनीचगृहार्कगैः ॥**
**शुभसंपूर्णपादोनदलपादाल्पनिष्फलं ॥**

**अर्थ**—बळाप्रमाणें ग्रहांचीं फळें.

| उच्च | मूळत्रि० | स्वगृह. | मित्रगृह. | शत्रुगृहीं. | नीच. | अस्त. |
|---|---|---|---|---|---|---|
| शुभ, | संपूर्ण, | पाऊण, | अर्ध, | पाद, | अल्प, | निर्फळ. |

॥ भावफलाध्याय संपूर्ण ॥ १८

---

## ॥ आश्रययोगाध्यायः ॥ १९



॥ पुष्पिताग्रा ॥ १, २

**कुलसमकुलमुख्यबंधुपूज्याधनिसुखिभोगिनृपाःस्व भैकवृद्ध्या ॥ परविभवसुहृत्स्वबंधुपोष्यागणबले शनृपाश्चमित्रभेषु ॥ मालिनी ॥ जनयतिनृपमेको प्युच्चगोमित्रदृष्टःप्रचुरधनसमेतंमित्रयोगाच्चसिद्धं ॥**

विधनविसुखमूढव्याधितोबंधतप्तोवधदुरितसमेतः शत्रुनीचर्क्षगेषु ॥ २ ॥

अर्थ—ग्रह हे; स्वगृहीं, मित्रगृहीं इ० किती किती असतां कशीं फळें होतात तें खालीं दाखविलें आहे.

१ २ ३ ४ ५ ६ ७

स्वगृ०—कुलसम, कुलमुख्य, बांधवश्रेष्ठ, धनिक, सुखी, भोगी, नरेंद्र.

मि. गृ.-परजी. मित्रजी. आप्तजी. बंधुजी. मंडळमुख्य, सेनापति, नरेंद्र.

श. गृ. / नी. गृ. } धनहीन, सुखहीन, मूढ, व्याधित, बंधन, संतप्त, वध, पापी.

जन्मकाळीं एक जरी ग्रह उच्च असा असेल तर; राजा आणि तोच मित्रदृष्ट असा असेल तर;— मित्र योगेंकरून विपुल धन आणि सन्मानयुक्त असा होईल.

॥ उपजातिका ॥ ३

नकुंभलग्नंशुभमाहसत्योनभागभेदाद्यवनावदंति॥कस्यांशभेदोनतथास्तिराशेरतिप्रसंगस्त्वितिविष्णुगुप्तः ॥

अर्थ—जन्मकाळीं कुंभलग्न शुभ नव्हे असें **सत्याचार्य** ह्मणतात, आणि कुंभलग्नाचा अंश अशुभ असें **यवनाचार्य** ह्मणतात. परंतु कुंभ लग्न किंवा त्याचा कोणताही अंश अशुभच नव्हे. हा अति प्रसंग आहे. असें **विष्णुगुप्त** ह्मणतात.

॥ वसंततिलका ॥ ४

यातेष्वसत्स्वसमभेषुदिनेशहोरांख्यातोमहोद्यमबलार्थयुतोतितेजाः ॥ चांद्रींशुभेषुयुजिमार्दवकांतिसौख्यसौभाग्यधीमधुरवाक्ययुतःप्रजातः ॥

अर्थ—पापग्रह हे, विषम राशीस सूर्याचे होरेमध्यें असतील तर; विख्यात, महान् उद्योगी, बळ आणि धन यांहीं युक्त, व तेजस्वी असा पुरुष होतो.—शुभग्रह हे समराशीस चंद्राचे होरेंत असतील तर; मृदु, कांति, सौख्य, शोभा, बुद्धि, मधुरवाणी, यांहींकरून युक्त असा होतो.

॥ इंद्रवज्रा ॥ ५

तास्वेवहोरास्वपरर्क्षगेषुज्ञेयानराःपूर्वगुणेषुमध्याः॥व्य
त्यस्तहोराभवनस्थितेषुमर्त्याभवंत्युक्तगुणैर्विहीनाः ॥

अर्थ—पापग्रह हे, समराशीस असून, सूर्याचे होरेंत; आणि शुभ ग्रह, विषमराशीस चंद्राच्या होरेंत असतील; तर वर सांगितलेले गुण मध्यम होतील.—पापग्रह हे, समराशीस चंद्राच्या होरेंत व शुभग्रह हे, विषमराशीस सूर्याचे होरेंत असतील तर, सांगितलेल्या गुणानीं हीन असा होईल.

॥ वसंततिलका ॥ ६

कल्याणरूपगुणमात्मसुहृद्दृकाणेचंद्रोन्यगस्तदधि
नाथगुणंकरोति ॥ व्यालोद्यतायुधचतुश्चरणांडजे
षुतीक्ष्णोऽतिहिंस्रगुरुतल्परतोऽटनश्च ॥

अर्थ—चंद्र हा, स्व, किंवा मित्र, द्रेष्काणीं असेल तर; रूप व गुण हे उत्तम असतील.—आणि तोच अन्य द्रेष्काणीं असतां त्या द्रेष्काण स्वामीच्या गुणाप्रमाणें जाणावें.—व्यालद्रे॰ अ॰;—उग्र; उद्यतायुधद्रे॰ अ॰;—

शस्त्रधारी; चतुष्पादद्रे० अ०;–गुरुतल्पग;–पक्षी द्रे० अ०;– भ्रमणशील; असीं चंद्राचे द्रेष्काणावरून लक्षणें जाणावीं. ( पुढील द्रेष्काणाध्याय २९ पहा )

॥ शालिनी ॥ ७

स्तेनोभोक्तापंडिताढ्योनरेंद्रःक्लीवःशूरोविष्टिकृद्दासवृत्तिः॥ पापोहिंस्त्रोभीश्चवर्गोत्तमांशेष्वेषाभीशाराशिवद्द्वादशांशैः ॥

अर्थ—चंद्र हा राशींच्या नवमांशीं ( संध्येंतील जन्मनांव, हा एक राशिनवमांशच आहे ) असतां, फळें.

| | | |
|---|---|---|
| मेष —तस्कर. | सिंह —राजा. | धन —दास. |
| वृष० —भोक्ता. | कन्या —क्लीव. | मक०—पापी. |
| मिथु०—पंडित. | तूळ —शूर. | कुंभ —हिंस्त्र. |
| कर्क —धनिक. | वृश्चि०—भारवाही. | मीन —निर्भय. |

वर्गोत्तम ह्य० राशीच्या स्वनवमांशीं चंद्र असला तर तो पुरुष त्या त्या गुणांचा स्वामी होतो. चंद्र द्वादशांशांचे गुण राशिगुणाप्रमाणें जाणावे. (राशिशीलाध्या० जन्मराशिस्व० हे पहा. )

॥ वसंततिलका ॥ ८

जायान्वितोबलविभूषणसत्वयुक्तस्तेजोतिसाहसयुतश्चकुजेस्वभागे॥ रोगीमृतस्वयुवतिर्विषमोन्यदारोदुःखीपरिच्छदयुतोमलिनोर्कपुत्रे॥ स्वांशेगुरौधनयशःसुखबुद्धियुक्तास्तेजस्विपूज्यनिरुगुद्यमभोगवंतः ॥ मेधाकलाकपटकाव्यविवाद

शिल्पशास्त्रार्थसाहसयुताःशशिजेतिमान्याः ॥
॥ मंदाक्रांता ॥ स्वेत्रिंशांशेबहुसुतसुखारोग्यभा
ग्यार्थरूपःशुक्रेतीक्ष्णःसुललितवपुःसुप्रकीर्णेंद्रि
यश्च॥शूरस्तब्धौविषमवधकौसद्गुणाढ्यौसुखिज्ञौ
चार्वंगेशौरविशशियुतेष्वारपूर्वांशकेषु ॥ ९ ॥

**अर्थ**—ग्रह हे, स्वत्रिंशांशीं असतां ( अध्या० १ श्लो० ७ पहा ) खालीं दाखविल्याप्रमाणें फळें होतात.

**ग्रह**— **स्वत्रिंशांशफळें.**

**मंगळ**—स्त्रीयुक्त, भूषित, उदार, अतितेजस्वी, अतिसाहसी.
**शनि** —रोगी, मृतपत्निक, विरोधी, परदारी, दुःखी, वस्त्रप्रावरणयुक्त, मलिन.
**गुरु** —सधन, यशस्वी, सुखी, बुद्धिमान्, तेजस्वी, पूज्य, निरोगी, उद्यमी, भोगवान्.
**बुध** —बुद्धि, कला, कपट, काव्य, विवाद, शिल्प, शास्त्रार्थ, साहस, अशा गुणांनीं युक्त; व अतिमान्य.
**शुक्र** —संतान, सुख, आरोग्य, भाग्य, धन, रूप, हीं बहुत प्राप्त; तीक्ष्णपणा, सुंदरशरीर, व इंद्रियोपभोगी.

( सूर्य चंद्र हे, ग्रहांच्या त्रिंशांशीं असतां फळें )

| | **मंग.** | **शनि.** | **गुरु.** | **बुध.** | **शुक्र.** |
|---|---|---|---|---|---|
| **सूर्य**— | शूर. | क्रूर. | सद्गुण. | सुखी. | सुकुमार. |
| **चंद्र**— | स्तब्ध. | हिंसक. | धनाढ्य. | पंडित. | मित्र. |

॥ **आश्रययोगाध्यायसंपूर्ण** ॥ १९

---

## ॥ प्रकीर्ण योगाध्याय: ॥ २०

( अवांतर योग. )



॥ वैतालिक ॥ १

स्वर्क्षतुंगमूलत्रिकोणगा:कंटकेषुयावंतआश्रिता: ॥
सर्वएवतेन्योन्यकारका:कर्मगस्तुतेषांविशेषत: ॥

अर्थ—स्वक्षेत्रीं, स्वोच्च, स्वमूलत्रिकोण, अशा स्थानीं असलेले ग्रह परस्पर केंद्राश्रित असतील ; आणि विशेषेंकरून, परस्परांच्या दशमस्थानीं असतील ; तर ते ग्रह कारक संज्ञक होतात.

॥ रथोध्धता ॥ २

कर्कटोदयगतेयथोडुपेस्वोच्चगा:कुजयमार्कसूरय: ॥
कारकानिगदिता: परस्परंलग्नगस्यसकलोंबरांबुग:॥

अर्थ—जसें, कर्कलग्नीं ( कुंडली मांडून पहा ) स्वगृहींचा चंद्र ; व मंगळ, शनि, सूर्य, गुरु, हे उच्चस्थ; असे असतां, ते ग्रह परस्पर कारक जाणावे. कारण ते लग्नस्थ ग्रहास परस्पर दशम चतुर्थ असे आहेत.

॥ अनुष्टुप् ॥ ३

स्वत्रिकोणोच्चगोहेतुरन्योन्यंयदिकर्मग:॥सुहृत्तद्गुणसंपन्न: कारकश्चापिसंस्मृत: ॥

अर्थ—स्वगृहीं, मूलत्रिकोणीं, उच्च, हे ग्रह परस्पर दशमस्थ असतां कारक होतात; आणि मित्रत्व असणारे ग्रहही परस्पर दशमस्थ असतां कारक होतात.

॥ अनुष्टुप् ॥ ४

**शुभवर्गोत्तमेजन्मवेशिस्थानेचसद्ग्रहे ॥**
**अशून्येषुचकेंद्रेषुकारकाख्यग्रहेषुच ॥**

**अर्थ**—वर्गोत्तमांशीं ( राशिस्वनवमांशीं ), लग्न व चंद्र असतां ;—वेशिस्थानीं ( सूर्याचे द्वितीयस्थानीं ) शुभग्रह असतां ;—केंद्रीं कोणी तरी ग्रह असतां ;—परस्पर कारक संज्ञक ग्रह असतां ;—अशा योगावर जन्मास येणारांचा जन्म शुभ होतो.

॥ वैतालिका ॥ ५

**मध्येवयसःसुखप्रदाःकेंद्रस्थागुरुजन्मलग्नपाः ॥**
**पृष्ठोभयकोदयर्क्षगास्त्वंतेंतःप्रथमेषुपाकदाः ॥**

**अर्थ**—गुरु, जन्म ( चंद्र ) स्वामी, लग्नस्वामी, हे केंद्रीं असतील; तर मध्यवयामध्यें सुखदायक.— पृष्ठोदय, उभयोदय, शीर्षोदय, ह्या राशीस असणारे दशास्वामी हे मध्यें, अंतीं, प्रथम, ह्या अनुक्रमानें दशाफळ देतात.

॥ पुष्पिताग्रा ॥ ६

**दिनकररुधिरौप्रवेशकालेगुरुभृगुजौभुवनस्य**
**मध्ययातौ ॥ रविसुतशशिनौविनिर्गमस्थौश**
**शितनयःफलदस्तुसर्वकालं ॥**

**अर्थ**—सूर्य मंगळ हे प्रवेश होतांच, गुरु शुक्र मध्यें, शनि चंद्र अंतीं, व बुध सर्वकाळ असे ग्रहांचे फळ देण्याचे काळ आहेत.

॥ प्रकीर्णयोगाध्यायसंपूर्ण ॥ २०

## ॥ अनिष्टयोगाध्यायः ॥ २१

### ( दुःखी करणारे योग )

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १

लग्नात्पुत्रकलत्रभेशुभपतिप्राप्तेथवालोकितेचंद्रा
द्वायदिसंपदस्तिहितयोर्ज्ञेयोऽन्यथाऽसंभवः ॥ पा
थेनोदयगेरवौरविसुतोमीनस्थितोदारहापुत्रस्था
नगतश्चपुत्रमरणंपुत्रोऽवनेर्यच्छति ॥

अर्थ—लग्न व चंद्र यांजपासून, पांचवें व सातवें ह्या स्थानांचे स्वामी शुभ असून, तेथेंच असतील ;–किंवा त्या स्थानीं त्यांची दृष्टि असेल तर; पुत्र व स्त्री यांचें सौख्य होईल. असें नसेल तर त्यांचें सुख होणार नाहीं.–लग्नीं कन्येस सूर्य व मीनेस शनि हे ग्रह स्त्रीस मृत्युकारक होतात.–त्यांतच पुत्रस्थानीं मंगळ असेल तर तो पुत्रासही मृत्युकारक असें जाणावें.

॥ प्रहर्षिणी ॥ २

उग्रग्रहैःसितचतुरस्रसंस्थितैर्मध्यस्थितेभृगुतन
येथवोग्रयोः ॥ सौम्यग्रहैरसहितसन्निरीक्षिते
जायावधोदहननिपातपाशजः ॥

अर्थ—शुक्रापासून; उग्रग्रह हे चतुर्थ व अष्टम स्थानीं असतां दहनानें स्त्रीमृत्यु.–उग्र ग्रहांच्या मध्यें शुक्र अस-

तां उंच पतनानें स्त्रीस मृत्यु—शुक्र सौम्य ग्रहांशीं युक्त नसेल किंवा त्यांच्या दृष्टींनींही युक्त नसेल तर बंधनानें स्त्रीमृत्यु.—यांप्रकारें स्त्रीवध (मृत्यु) जाणावा.

॥ वसंततिलका ॥ ३

लग्नाद्व्ययारिगतयोः शशितिग्मरश्म्योः पत्न्यासहै
कनयनस्यवदंतिजन्म ॥ द्यूनस्थयोर्नवमपंचमसं
स्थयोर्वाशुक्रार्कयोर्विकलदारमुशंतिजातम् ॥

अर्थ—लग्नापासून चंद्र सूर्य हे, षष्ठ द्वादश स्थानीं समोरासमोर असतील तर पुरुष व स्त्री हीं उभयतां एकाक्ष असतील.—सप्तम, किंवा नवम, पंचम स्थानीं शुक्र सूर्य एकत्र असतील तर त्या पुरुषाची स्त्री एकादे अंगानें हीन असेल.

॥ मालिनी ॥ ४

कोणोदयेभृगुतनयेस्तचक्रसंधौवंध्यापतिर्यदिनसु
तर्क्षमिष्टयुक्तं ॥ पापग्रहैर्व्ययमदलग्नराशिसंस्थैः
क्षीणेशशिन्यसुतकलत्रजन्मधीस्ते ॥

अर्थ—उदयलग्नीं शनि व सप्तमस्थानीं शुक्र संधिराशीवर (गंडांत अ० १ पहा) असतां, आणि सुतस्थान हें शुभयुक्त नसेल तर तो पुरुष वंध्यापति जाणावा.—लग्न, सप्तम, व्यय, या स्थानीं पापग्रह व क्षीण चंद्र, सुत किंवा जायास्थानीं असेल तर पुत्र किंवा स्त्री असणार नाहींत.—

॥ हरिणी ॥ ५

असितकुजयोर्वर्गेऽस्तस्थेसितेतदवेक्षितेपरयुवतिग
स्तौचेत्सेंदुस्त्रियासहपुंश्चलः ॥ भृगुजशशिनोर
स्ते ऽ भार्योनरोविसुतोपिवापरिणततनुर्नृस्त्र्योर्दृष्टौ
शुभैःप्रमदापती ॥

अर्थ—शनि मंगळ यांचे वर्गीं (षड्वर्गांतील) शुक्र असून तो सप्तमस्थ असेल, व त्यावर त्या शनिमंगळांची दृष्टिही असेल तर तो पुरुष **परस्त्रीगमन करणारा** होईल.—तेच शनि मंगळ चंद्रासह सप्तम स्थानीं असतील तर तो व त्याची स्त्री असे **उभयतां व्यभिचारी** असतील.—शुक्र चंद्र हे सप्तम स्थानीं एकत्र असतील तर त्या पुरुषास स्त्री किंवा पुत्र **असणार नाहींत.**—नर व स्त्रीजाति असे दोन ग्रह सप्तम स्थानीं असतील, व त्यांजवर शुभग्रहांची दृष्टि जर नसेल तर तो पुरुष **वृद्धापकाळीं स्त्रीपति होईल.**

॥ मंदाक्रांता ॥ ६

वंशच्छेत्ताखमदसुखगैश्चंद्रदैत्येज्यपापैःशिल्पीत्र्यं
शेशशिसुतयुतेकेंद्रसंस्थार्किदृष्टे ॥ दास्यांजातो
दितिसुतगुरौरिःफगेसौरभागेनीचेकेंद्रोर्मदनगत
योर्दृष्टयोःसूर्यजेन ॥

अर्थ—दशमस्थ चंद्र, सप्तमस्थ शुक्र, चतुर्थस्थानीं पापग्रह, असे योगांवर **वंशाचा उच्छेद** होतो.—बुधयुक्त

द्रेष्काणीं शनि केंद्रस्थ असून त्या बुधास पाहात असेल तर तो पुरुष शिल्पी होतो.—शुक्र व्ययस्थानीं शनीच्या नवमांशीं असेल तर तो दासीपुत्र.—आणि सूर्य चंद्र हे सप्तमस्थानीं असतां त्यांवर शनीची दृष्टि असेल तर तो पुरुष नीच.—असे हे योग होतात.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ७

पापालोकितयोःसितावनिजयोरस्तस्थयोर्वाध्यरुक्
चंद्रेकर्कटवृश्चिकांशकगतेपापैर्युतेगुह्यरुक् ॥ श्वित्री
रिःफधनस्थयोरशुभयोश्चंद्रोदयेऽस्तेरवौचंद्रेखेवनि
जेऽस्तगेचविकलोयद्यर्कजोवेशिगः ॥

अर्थ—शुक्र मंगळ हे सप्तमस्थ असून, त्यांवर पापग्रहांची दृष्टि असेल तर वाध्यरोगी (अंतर्गळ)—चंद्र हा, कर्क किंवा वृश्चिक या नवमांशीं असून तो पापग्रहांशीं युक्त असेल तर गुह्यरोगी;—चंद्र हा, उदयलग्नीं असून त्याच्या द्वितीय द्वादशस्थानीं अशुभ ग्रह आणि सूर्य सप्तमस्थ; असे योगांवर श्वेतकुष्टी होतो;—चंद्र दशमस्थ, मंगळ सप्तमस्थ, शनि वेशिस्थानीं (सूर्यापासून दुसरा), असे योगांवर विकलांग (अवयवहीन) असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ ८

अंतःशशिन्यशुभयोर्मृगगेपतंगेश्वासक्षयप्लिहक
विद्रधिगुल्मभाजः ॥ शोषीपरस्परगृहांशगयो
रवींद्वोःक्षेत्रेथवायुगपदेकगयोःकृशोवा ॥

अर्थ—सूर्य हा, मकरेस व चंद्र हा अशुभ ग्रहांच्या मध्यें असें असेल तर; श्वास, क्षय, प्लिह, विद्रधि, गुल्म, इ० रोगांनीं पीडित असेल.–सूर्य चंद्र हे परस्परांच्या राशीस;–किंवा नवमांशीं असतील;–किंवा उभयतां एकमेकांचे गृहीं एकत्र असतील तर शोषी किंवा कृश असा असेल.

॥ वसंततिलका ॥ ९

चंद्रेश्विमध्यझषकर्किमृगाजभागेकुष्टीसमंदरु
धिरेतदवेक्षितेवा ॥ यातैस्त्रिकोणमलिकर्किवृ
षैर्मृगेचकुष्टीचपापसहितैरवलोकितैर्वा ॥

अर्थ—चंद्र हा, धनराशीच्या मध्यभागीं; किंवा मीन, कर्क, मकर, मेष, या अंशीं असून शनिमंगळांशीं युक्त किंवा त्यांची दृष्टि असेल, तर कुष्टी होईल.–वृश्चिक, कर्क, वृषभ, मकर, ह्या राशि, त्रिकोणीं (नव, पंचम) पापग्रहांसह किंवा पापदृष्ट असतील तर कुष्टी असें जाणावें.

॥ वैतालिका ॥ १०

निधनारिधनव्ययस्थितारविचंद्रारयमायथातथा ॥
बलवद्ग्रहदोषकारणैर्मनुजानांजनयंत्यनेत्रताम् ॥

अर्थ—अष्ट, षष्ठ, द्वितीय, द्वादश, ह्या स्थानीं सूर्य, चंद्र, मंगळ, शनि, हे कसेही असतील; तर त्यांमध्यें जो बलवान् असेल त्याचे दोषनिमित्ताने नेत्रहीनता होईल.

॥ वैतालिका ॥ ११

नवमायतृतीयधीयुतानचसौम्यैरशुभानिरीक्षिता: ॥
नियमाच्छ्रवणोपघातदारदवैकृत्यकराश्चसप्तमे ॥

अर्थ——नवम, पंचम, तृतीय, एकादश, ह्या स्थानीं पाप-ग्रह असतील, व त्यांवर शुभग्रहांच्या दृष्टि नसतील तर कर्णोपघात (कर्णच्छेद, बधिरत्व), आणि तेच ग्रह सप्तमस्थानीं असून, शुभदृष्ट नसतील तर दंत-वैकृत्य जाणावें.

॥ वैतालिका ॥ १२

उदयत्युडुपेऽसुरास्यगेसपिशाचोऽशुभयोस्त्रिकोणयो: ॥
सोपप्लवमंडलेरवावुदयस्थेनयनापवर्जित: ॥

अर्थ—चंद्र हा, लग्नीं राहुग्रस्त (ग्रहणांत); व नव पंचमस्थ पापग्रह (शनि मंगळ); असे योगांवर 'पिशाच-रूपी' होतो.—आणि असा जर सूर्य असेल तर 'नेत्रहीन' असें जाणावें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १३

संस्पृष्ट:पवनेनमंदगयुतेद्यूनेविलग्नेगुरौसोन्मादोऽ
वनिजेस्थितेऽस्तभवनेजीवेविलग्नाश्रिते ॥ तद्व
त्सूर्यसुतोदयेऽवनिसुतेधर्मात्मजद्यूनगेजातोवास
सहस्ररश्मितनयेक्षीणेव्ययेशीतगौ ॥

अर्थ—लग्नीं गुरु, सप्तमस्थ शनि असे असतां 'वातरो-गी'.—सप्तमस्थ मंगळ व लग्नीं गुरु असे योगांवर 'उन्मा-

दी.—शनि लग्नीं, व मंगळ पंचम, नवम, सप्तम, यांतून एका स्थानीं असतांही 'उन्मादी'—शनि व क्षीण चंद्र द्वादशस्थानीं एकत्र असतां 'उन्मादी' असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ १४

राश्यंशपोष्णकरशीतकरामरेज्यैर्नीचाधिपांशकगैररिभागगैर्वा ॥ एभ्योल्पमध्यबहुभिःक्रमशःप्रसूताज्ञेयाःस्युरभ्युपगमक्रयगर्भदासाः ॥

अर्थ—चंद्रस्थित राशिनवमांश स्वामी, सूर्य, चंद्र, गुरु, हे सर्व नीच नवमांशीं किंवा शत्रु नवमांशीं असतील तर 'दास' होतो.—ह्यांतून एक नीच नवमांश असतां 'उपजीविकेस्तव दास'; दोन नवमांश नीच असतां 'विक्रीत दास'; व तीन, चार नीच नवमांश असतील तर 'जन्मदास' असें जाणावें.

॥ हरिणी ॥ १५

विकृतदशनःपापैर्दृष्टेवृषाजहयोदयेखलतिरशुभक्षेत्रेलग्नेहयेवृषभेपिवा ॥ नवमसुतगेपापैर्दृष्टे रवावदृढेक्षणोदिनकरसुतेऽनेकव्याधिःकुजेविकलःपुमान् ॥

अर्थ—मेष, वृषभ, धन, यांचे उदयकाळीं (लग्नीं) त्यांवर पापग्रहांची दृष्टि असेल तर 'विरूपदंत'—पापग्रहांच्या राशि, धन, वृषभ, हे लग्नीं असून त्यांवर पापग्रहांची दृष्टि असेल तर 'खल्वाट',—सूर्य नवपंचम-

स्थ असून त्यावर पापग्रहांची दृष्टि असेल तर 'अदृढ-नेत्र'—असा शनि असेल तर 'अनेक व्याधि'—आणि असाच जर मंगळ असेल तर 'विकलांग' (अवयवहीन).

॥ पुष्पिताग्रा ॥ १६

व्ययसुतधनधर्मगैरसौम्यैर्भवनसमाननिबंधनं
विकल्प्यम् ॥ भुजगनिगडपाशभृद्दृकाणैर्बल
वदसौम्यनिरीक्षितैश्चतद्वत् ॥

अर्थ—धन, व्यय, सुत, धर्म, ह्या स्थानीं क्रूर ग्रह असतील तर स्थान राशीच्या बंधनासारिखे पदार्थानीं 'बंधन'—किंवा भुजंग, निगड, पाश या द्रेष्काणीं (अ० २९ पहा) त्या स्थानराशि असून, बलिष्ठ अशा पापग्रहांच्या दृष्टि जर त्यांवर असतील तर त्या द्रेष्काणांच्या स्वभावासारिखें बंधन जाणावें.

॥ हरिणी ॥ १७

परुषवचनोऽपस्मारार्तः क्षयीचनिशापतौसर
वितनयेवक्रालोकंगतेपरिवेषगे ॥ रवियमकुजैः
सौम्याद्दृष्टैर्नभस्थलमाश्रितैर्भृतकमनुजःपूर्वोद्दि
ष्टैर्वराधममध्यमाः ॥

अर्थ—चंद्र शनि हे एकत्र असतां 'अप्रियभाषणी;' त्यांवर मंगळाची दृष्टि असली तर 'अपस्मार' (फेपरें); इतकेही असून ते (शनि चंद्र) परिवेषयुक्त (खळयांत) असतील तर 'क्षयरोगी'; असें जाणावें. सूर्य, शनि, मंगळ हे शुभग्रहांच्या दृष्टीनें रहित असे

दशमस्थानीं असतील तर तो पुरुष 'भृत्य' (चाकर) होतो; त्यांतून जर एकच ग्रह (दशमस्थ) असेल तर 'श्रेष्ठ भृत्य;' दोन ग्रह असतील तर 'मध्यमभृत्य'; व तीनही ग्रह असतील तर 'अधम भृत्य;' असें जाणावें.

॥ अनिष्टयोगाध्याय संपूर्ण ॥ २१

---

## ॥ स्त्रीजातकाध्यायः ॥ २२

### ॥ स्त्रीजन्मविचार ॥



॥ वसंततिलका ॥ १

यद्यत्फलंनरभवेक्षममंगनानांतत्तद्वदेत्पतिषुवा सकलंविधेयं ॥ तासांतुभर्तृमरणंनिधनेवपुस्तु लग्नेंदुगंसुभगताऽस्तमयेपतिश्च ॥

अर्थ—पुरुषजन्मास जें फल तें जर स्त्रीजन्मास असंभवित असेल तर तें किंवा सर्वही तिचे पतीस योजावें.–तिच्या पतीचें मरण तिच्या अष्टमस्थानाप्रमाणें–व तिचें शरीर लग्न व चंद्राप्रमाणें–आणि सौभाग्य व पतीचें लक्षण सप्तमस्थानावरून जाणावें.

॥ वसंततिलका ॥ २

युग्मेषुलग्नशशिनोःप्रकृतिस्थितास्त्रीसच्छीलभूषणयुताशुभदृष्टयोश्च ॥ ओजस्थयोश्चमनुजाकृतिशीलयुक्तापापाचपापयुतवीक्षितयोर्गुणोना ॥

**अर्थ**—लग्न व चंद्र हे समराशीस असता 'स्त्रीस्वभावाची'—व असें असून त्यांजवर शुभग्रहांच्या दृष्टि असतील तर ती सच्छीलभूषित अशी होत्ये—लग्न व चंद्र हे विषम राशीस असतील तर ती 'पुरुषस्वभावाची'—असें असून त्याजवर पापग्रहांची दृष्टि असेल तर किंवा तें लग्न, व चंद्र हे पापयुक्त असतील तर ती पापशील व गुणांनीं हीन अशी होत्ये.

॥ इंद्रवज्रा ॥ ३।४।५

कन्यैवदुष्टाव्रजतीहदास्यंसाध्वीसमायाकुचरित्र युक्ता ॥ भूम्यात्मजर्क्षेक्रमशोंशकेषुवक्रार्किजीवेंदुजभार्गवानाम् ॥ ३ ॥ दुष्टापुनर्भूः सगुणा कलाज्ञाख्यातागुणैश्चासुरपूजितर्क्षे ॥ स्यात्कापटीक्लीबसमासतीचबौधेगुणाढ्याप्रविकीर्णकामा ॥ ४ ॥ शार्दूलवि० ॥ स्वच्छंदापतिघातिनीबहुगुणाशिल्पिन्यसाध्वींदुभेत्राचाराकुलटार्कभेनृपवधूपुंचेष्टितागम्यगाः ॥ जैवेनैकगुणाल्परत्यतिगुणाविज्ञानयुक्तासतीदासीनीचरतार्किभे पतिरतादुष्टाऽप्रजास्वांशकैः ॥ ५

**अर्थ**—लग्न व चंद्र हे ज्या राशीस ज्या त्रिंशांशीं असतील त्यांच्या स्वामीवरून त्यांचीं फळें खालीं कोष्टकांत दाखविलीं आहेत त्यांवरून जाणावीं;—

## त्रिंशांशपति फळ कोष्टक.

| मंग. | शनि. | गुरु. | बुध. | शुक्र. |
|---|---|---|---|---|
| मंग—दुष्टकन्या | दासी. | साध्वी. | मायावी | कुचरित्रा. |
| शुक्र—दुष्टा. | पुनर्भू | गुणवती. | कलाकुश. | गुणख्याता. |
| बुध—कपटी | क्लीबा | साध्वी. | गुणाढ्या. | मदनवि० |
| चंद्र—स्वच्छंदा. | पतिघाति. | बहुगुणी. | शिल्पा | असाध्वी. |
| सूर्य—पौरुषा. | कुलटा. | राजपत्नी. | पुरु.चेष्टा. | अगम्य० |
| गुरु—बहुगुणा. | अल्परति. | बहुगुणा. | ज्ञानयुक्ता. | असाध्वी. |
| शनि—दासी. | नीचरता | पतिरता | दुष्टा. | अग्रजा. |

॥ अनुष्टुप् ॥ ६

शशिलग्नसमायुक्तैःफलंत्रिंशांशकैरिदम् ॥
बलाबलविकल्पेनतयोरुक्तंविचिंतयेत् ॥

अर्थ—हीं वर सांगितलेलीं त्रिंशांशकांचीं फळें त्यावर लग्न व चंद्र हे युक्त असतां, बली हीनबली त्यांमध्यें असेल तसा विचार करून योग्य तेंच घ्यावें.

॥ प्रहर्षिणी ॥ ७

दृक्संस्थावसितासितौपरस्परांशेशौक्रेवायदिघ
टराशिसंभवोंशः॥ स्त्रीभिःस्त्रीमदनविषानल
प्रदीप्तंसंशांतिंनयतिनराकृतिस्थिताभिः ॥

अर्थ—शनि शुक्र हे परस्परांच्या नवमांशीं असून एकमेकांस पाहात असतील तर—किंवा वृष तूळ हे कुंभनवमांशीं होत्साते लग्नीं असतील तर—ती स्त्री दुसऱ्या

स्त्रीकडून पुरुषासारिखी कृति करवून, विषाग्निरूप जो मदन तो प्रदीप्त असतां त्याची शांति करवून घेत्ये.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ८

शून्येकापुरुषोऽबलेऽस्तभवनेसौम्यग्रहावीक्षिते
क्लीवोस्तेबुधमंदयोश्चरगृहेनित्यंप्रवासान्वितः ॥
उत्सृष्टारविणाकुजेनविधवाबाल्येऽस्तराशिस्थि
तेकन्यैवाशुभवीक्षितेर्कतनयेद्यूनेजरांगच्छति ॥

अर्थ—लग्न व चंद्र यांपासून सप्तमस्थान हें शून्य ( ग्रहावांचून ) असेल ; किंवा त्या सप्तमस्थानीं निर्बळ ग्रह असून सौम्य अशा ग्रहांची दृष्टि नसेल तर ; कुत्सितभर्ता.—सप्तमस्थानीं बुध शनि असतां, पति नपुंसक.—सप्तमस्थान हें चर राशियुक्त असेल तर भर्ता निरंतर प्रवासी.—सप्तमस्थानीं सूर्य असेल तर पतीनें टाकलेली.—सप्तमस्थ मंगळ असेल तर बालविधवा.—सप्तमस्थ शनि असेल तर बाल्यजरा.—हे सूर्य, मंगळ, शनि, जर पापदृष्ट असतील ; तर असें होतें ; शुभदृष्ट असतां अन्यथा असें जाणावें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ९

आग्नेयैर्विधवाऽस्तराशिसहितैर्मिश्रैः पुनर्भूर्भवे
त्क्रूरेहीनबलेस्तगेस्वपतिनासौम्येक्षितेप्रोज्झिता ॥
अन्योन्यांशगयोःसितावनिजयोरन्यप्रसक्तांगना
द्यूनेवायदिशीतरश्मिसहितौभर्तुस्तदानुज्ञया ॥

अर्थ—उग्र ग्रह, सप्तमस्थानीं असतील तर विधवा;—मिश्रग्रह, सप्तमस्थानीं असतां पुनर्भू;—सप्तमस्थ क्रूर ग्रह बलहीन असा सौम्य ग्रहाचे दृष्टीनें युक्त असेल तर पतीनें टाकलेली;—शुक्र मंगळ हे परस्परांचे नवमांशीं (कोणत्याही राशीस व स्थानीं) असतील किंवा ते उभयतांही चंद्रांशीं युक्त होत्साते सप्तमस्थानीं असतील तर पतीच्या आज्ञेनें परपुरुषगमन असें जाणावें.

॥ मालिनी ॥ १०

सौरारक्षेलग्नगेसेंदुशुक्रेमात्रासार्धंबंधकीपापदृ
ष्टे॥कौजेऽस्तांशेसौरिणाव्याधियोनिश्चारुश्रो
णीवल्लभासद्ग्रहांशे ॥

अर्थ—शुक्र चंद्र हे, लग्नीं शनिमंगळांचे गृहीं असतील व त्यांजवर पापग्रहांची दृष्टि असेल तर ती स्त्री मातेसह जारिणी;—सप्तमस्थान राशि ही मंगळाचे नवमांशीं असून तेथें शनीची दृष्टि असेल तर त्या स्त्रीची योनि व्याधीनें पीडित असेल;—सप्तमस्थान राशीचा नवमांश जर शुभ ग्रहांचा असेल तर ती स्त्री कटीसुंदर व प्रिय अशी होत्ये.

॥ मालिनी ॥ ११ ॥ पुष्पिताग्रा ॥ १२

वृद्धोमूर्खःसूर्यजर्क्षेऽशकेवास्त्रीलोलःस्यात्क्रोध
नश्चावनेये ॥ शौक्रेकांतोतीवसौभाग्ययुक्तोवि
द्वान्भर्तानैपुणज्ञश्चबौधे ॥ ११ ॥ मदनवशग
तोमृदुश्चचांद्रेत्रिदशगुरौगुणवान्जितेंद्रियश्च ॥

अतिमृदुरतिकर्मकृच्चसौर्यंभवतिगृहेस्तमयस्थि
तेंशकेवा ॥

अर्थ—सप्तमस्थानीं ग्रहांचा राशि किंवा नवमांश या-
जवरून पतिलक्षण जाणण्याचें कोष्टक खालीं दाखविलें
आहे;–

| | |
|---|---|
| सूर्य—वृद्ध किं० मूर्ख. | चंद्र—कामवश व मृदु. |
| मंगळ—स्त्रीवश व क्रोधी. | गुरु—गुणवान्, जितेंद्रिय. |
| शुक्र—अतिस्वरूप, अतिप्रिय | शनि—अतिमृदु, अतिकर्म. |
| बुध—विद्वान्, ज्ञाननिपुण. | |

॥ वसंततिलका ॥ १३

ईर्ष्यान्वितासुखपराशशिशुक्रलग्नेज्ञेंद्वोः कलासु
निपुणासुखितागुणाढ्या ॥ शुक्रज्ञयोस्तुरुचिरा
सुभगाकलाज्ञात्रिष्वप्यनेकवसुसौख्यगुणाशुभेषु ॥

अर्थ—लग्नीं ग्रह असतां स्त्रीलक्षणें खालीं दाखविलीं
आहेत.

शुक्रचंद्र —ईर्ष्यायुक्त, व सुखासक्त.
बुधचंद्र —कलानिपुण, सुखी, गुणाढ्या.
शुक्रबुध —स्वरूपा, सौभाग्या, कलाकुशला.
चंद्रबुधशुक्र —धन, सौख्य, गुण, हीं विपुल. जर हे
ग्रह शुभ असतील तर असें होईल.

॥ वसंततिलका ॥ १४

क्रूरेष्टमेविधवतानिधनेश्वरांशेयस्यस्थितोवयसि

तस्यसमेप्रदिष्टा ॥ सत्स्वर्थगेषुमरणंस्वयमेवत
स्या:कन्यालिगोहरिषुचाल्पसुतत्वमिंदौ ॥

अर्थ—अष्टमस्थानीं क्रूर ग्रह असतां वैधव्यप्राप्ति ;— परंतु त्या स्थानचा स्वामी ज्या नवमांशीं असेल त्या नवमांशस्वामीच्या वयामध्यें तो वैधव्ययोग होतो.— द्वितीय स्थानीं शुभ ग्रह असले तर तिला स्वयमेव मृत्यु प्राप्त;—कन्या, वृश्चिक, वृषभ, सिंह, यांवर चंद्र असतां अल्प संतानयोग जाणावा.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १५

सौरेमध्यबलेबलेनरहितै:शीतांशुशुक्रेंदुजै:शेषै
र्वीर्यसमन्वितै:पुरुषिणीयद्योजराश्युद्गम:॥जी
वारास्फुजिदैंदवेषुबलिषुप्राग्लग्नराशौसमेवि
ख्याताभुविनैकशास्त्रनिपुणास्त्रीब्रह्मवादिन्यपि ॥

अर्थ—शनि हा मध्यमबली; चंद्र, शुक्र, बुध, हे बलहीन; व बाकीचे ग्रह (सू. मं. गु.) बलिष्ठ असतील, व लग्नीं विषम राशि असेल तर, ती स्त्री पुरुषाचरणी होत्ये. गुरु, मंगळ, शुक्र, बुध, हे बलिष्ठ असून लग्नीं समराशि असतील, तर भूमंडळीं विख्यात, अनेक शास्त्रनिपुण, आणि ब्रह्मज्ञानी अशी ती स्त्री होत्ये.

॥ प्रहर्षिणी ॥ १६

पापेस्तेनवमगतग्रहस्यतुल्यंप्रव्रज्यांयुवतिरुपैत्य
संशयेन ॥ उद्वाहेवरणविधौप्रदानकालेचिंता
यामपिसकलंविधेयमेतत् ॥

अर्थ—सप्तम स्थानीं पापग्रह असून जर नवमस्थानीं कोणी ग्रह असेल तर त्या नवमस्थानस्थ ग्रहाच्या गुणाप्रमाणें निःसंशय ती स्त्री प्रव्रज्या (वैराग्यदीक्षा) धारण करित्ये:—याप्रकारें हें 'स्त्रीजातक' विवाहकाळीं, कन्या वरतेवेळीं, कन्यादानकाळीं, प्रश्नकाळीं, सर्व प्रकारें योजावें.

॥ स्त्रीजातकाध्यायसंपूर्ण ॥ २२

---

## ॥ निर्याणाध्यायः ॥ २३

### (मरण कशाप्रकारें व नंतरची गति)

॥ शार्दूलविक्रीडित ॥ १

मृत्युर्मृत्युगृहेक्षणेनबलिभिस्तद्धातुकोपोद्भवस्त
त्संयुक्तभगात्रजोबहुभवोवीर्यान्वितैर्भूरिभिः ॥
अग्न्यंब्वायुधजोज्वरामयकृतस्तृट्क्षुत्कृतश्चाष्टमे
सूर्याद्यैर्निधनेचरादिषुपरस्वाध्वेप्रदेशोध्विति ॥

अर्थ—अष्टमस्थानीं जो ग्रह बलिष्ठ दृष्टीनें पाहात असेल त्याच्या धातुकोपानें (अ० २ श्लो० ९।१२ पहा) त्या अष्टमस्थराशीचा कालांग विभाग जो असेल त्या अवयवास पीडा प्राप्त होऊन मृत्यु—तो बलिष्ठ ग्रह चरराशीस असतां विदेशीं, स्थिर राशीस अ० स्वदेशीं, द्विस्वभाव रा० अ० मध्यंतरीं मृत्यु योग, खालीं दाख-

विल्या कारणापासून त्या त्या ग्रहांनीं प्राप्त होतात;-
सूर्य. चंद्र. मंगळ. बुध. गुरु. शुक्र: शनि.
अग्नि. जल. आयुध. ज्वर. रोगकृत्. तृषा. क्षुधा.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ २

शैलाग्राभिहतस्यसूर्यकुजयोर्मृत्यु:खबंधुस्थयो:
कूपेमंदशशांकभूमितनयैर्बंध्वस्तकर्मस्थितै: ॥ कं
न्यायांस्वजनाद्धिमोष्णकरयो: पापग्रहैर्दृष्टयो:
स्यातांयद्युभयोदयेर्कशशिनौतोयेंतदामज्जित: ॥

अर्थ—सूर्य मंगळ हे, चतुर्थ दशम ह्या स्थानीं असतां शिलाप्रहारानें मृत्यु;—चतुर्थ स्थानीं शनि, सप्तमस्थ चंद्र, दशमस्थ मंगळ, असे योगांवर विहिरींत मृत्यु;—चंद्र सूर्य हे कन्येस पापदृष्ट असतील तर स्वजनापासून मृत्यु;— उभयोदय ह्मणजे मीन राशीस (टी० द्विस्वभाव राशि ह्म०) चंद्र सूर्य असतां पाण्यांत बुडून मृत्यु;—

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ३

मंदेकर्कटगेजलोदरकृतोमृत्युर्मृगांकेमृगेशस्त्राग्नि
प्रभव:शशिन्यशुभयोर्मध्येकुजर्क्षस्थिते ॥ कन्या
यांरुधिरोत्थशोषजनितस्तद्वत्स्थितेशीतगौसौर
र्क्षेयदितद्वदेवहिमगौरज्ज्वग्निपातै:कृत: ॥

अर्थ—शनि कर्केस व चंद्र मकरेस असतां जलोदरानें मृत्यु;—चंद्र हा, मंगळाचे राशीस पापग्रहांच्या मध्यें असेल तर शस्त्र किंवा अग्नीपासून मृत्यु;—चंद्र हा पाप-

ग्रहांचे मध्यें असा कन्येस असतां शोष व रक्तप्रकोपानें मृत्यु;—चंद्र हा, शनीच्या राशीस पापग्रहांच्या मध्यें असेल तर, दोरी, अग्नि, पतन (वृक्ष इ०), यांपासून मृत्यु.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ८

बंधाध्धीनवमस्थयोरशुभयोःसौम्यग्रहादृष्टयोर्द्रे
ष्काणैश्चससर्पपाशनिगडैश्छिद्रस्थितैर्बंधतः ॥
कन्यायामशुभान्विते ऽस्तमयगेचंद्रेसितेमेषगेसू
र्येलग्नगतेचविद्धिमरणंस्त्रीहेतुकंमंदिरे ॥

अर्थ—पंचम, नवम ह्या स्थानीं पापग्रह हे सौम्य ग्रहांच्या दृष्टींनीं रहित असतील तर बंधनानें मृत्यु;—अष्टम स्थानीं सर्प, पाश, निगड, (अ० २५ पहा) हे द्रेष्काण असतील तर बंधनानें मृत्यु;—कन्येचा चंद्र सप्तमस्थानीं पापग्रहयुक्त, मेषेस शुक्र, सूर्य लग्नीं (मीन) असे योगांवर मंदिरांतच स्त्रीपासून मृत्यु;—

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ९

शूलोद्भिन्नतनुःसुखे ऽवनिसुतेसूर्येपिवाखेयमेसप्र
क्षीणहिमांशुभिश्चयुगपत्पापैस्त्रिकोणाद्यगैः ॥ बं
धुस्थेचरवौवियत्यवनिजेक्षीणेंदुसंवीक्षितेकाष्ठेना
भिहतःप्रयातिमरणंसूर्यात्मजेनेक्षिते ॥

अर्थ—मंगळ किंवा सूर्य हे चतुर्थस्थ; दशमस्थ शनि असे योगांवर शूलव्यथेनें मृत्यु;—चतुर्थस्थ सूर्य, दशमस्थ

मंगळ, हे क्षीण चंद्राचे दृष्टीनें युक्त असतील तर शूलव्यथेनें मृत्यु;—ह्या योगांवर शनीची दृष्टि असतां काष्ठताडनानें मृत्यु;—

॥ वसंततिलका ॥ ६

रंध्रास्पदांगहिबुकैर्लगुडाहतांगःप्रक्षीणचंद्ररुधि
रार्किदिनेशयुक्तैः ॥ तैरेवकर्मनवमोदयपुत्रसंस्थै
र्धूमाग्निबंधनशरीरनिकुट्टनांतः ॥

अर्थ—अष्टमस्थ चंद्र, दशमस्थ मंगळ, लग्नस्थ शनि, चतुर्थस्थ सूर्य, असे ग्रहयोगांवर काष्ठप्रहारानें मृत्यु;—हेच ग्रह क्रमानें दशम, नवम, लग्न, पंचम ह्या स्थानीं असतां; धूम, अग्नि, बंधन, ताडन, यांहींकरून मृत्यु जाणावा.

॥ वसंततिलका ॥ ७

बंध्वस्तकर्मसहितैःकुजसूर्यमंदैर्निर्याणमायुधशि
खिक्षितिपालकोपात् ॥ सौरेंदुभूमितनयैःस्वसु
खास्पदस्थैर्ज्ञेयःक्षतकृमिकृतश्चशरीरघातः ॥

अर्थ—चतुर्थस्थ मंगळ, [illegible]स्थ सूर्य, दशमस्थ शनि असे योगांवर शस्त्र, अग्नि, राजकोप, यांजपासून मृत्यु;—द्वितीयस्थ शनि, चतुर्थस्थ चंद्र, दशमस्थ मंगळ असे ग्रह असतां क्षतांमध्यें कृमि पडून मृत्युयोग जाणावा.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ८

खस्थेर्केऽवनिजेरसातलगतेयानप्रपाताद्वधोयंत्रो

त्पीडनज:कुजे ऽस्तमयगेसौरेंद्विनाभ्युद्गमे॥ विण्म
ध्येरुधिरार्किशीतकिरणैर्जूकाजसौरर्क्षगैर्यातैर्वाग
लितेंदुसूर्यरुधिरैर्व्योमास्तबंध्वाव्हयान् ॥

अर्थ—दशमस्थ सूर्य, चतुर्थस्थ मंगळ, असे योगांवर वाहनावरून पतनानें मृत्यु;—मंगळ सप्तमस्थ; शनि, चंद्र, रवि हे लग्नस्थ; असे योगांवर यंत्रपीडेनें मृत्यु;—तुळेस मंगळ, मेषेस शनि, चंद्र मकर कुंभेस, असे ग्रह असतां दुर्गंधीमध्यें मृत्यु;—क्षीण चंद्र दशमस्थ, सप्तमस्थ सूर्य, चतुर्थस्थ मंगळ, असे योगांवरही दुर्गंधींत मृत्यु जाणावा.

॥ वैतालिका ॥ ९

वीर्यान्वितवक्रवीक्षिते क्षीणेंदौनिधनस्थितेर्कजे॥गुह्यो
द्भवरोगपीडयामृत्यु:स्यात्कृमिशस्त्रदाहज: ॥

अर्थ—क्षीण चंद्रावर बलिष्ठ अशा मंगळाची दृष्टि असेल व शनि हा अष्टमस्थानीं असेल तर गुह्यस्थानीं रोग होऊन तेथें कृमि, शस्त्र, दाह यांची पीडा होऊन मृत्यु जाणावा.

॥ वसंततिलका ॥ १०

अस्तेरवौसरुधिरेनिधनेर्कपुत्रेक्षीणेरसातलगते
हिमगौखगांत:॥लग्नात्मजाष्टमतपस्विनभौमसं
दचंद्रैस्तुशैलशिखराशनिकुड्यपातै: ॥

अर्थ—सूर्य मंगळ हे, सप्तमस्थ; अष्टमस्थ शनि, चतुर्थस्थ क्षीण चंद्र, असे योगांवर पक्ष्यापासून मृत्यु;—ल-

मीं सूर्य, पंचमस्थ मंगळ, अष्टमस्थ शनि, नवमस्थ चंद्र, असे ग्रहयोगांवर 'पर्वतावरून, किंवा वीज पडून, किंवा भिंत पडून, मृत्यु जाणावा.

॥ वैतालिका ॥ ११

द्वाविंशःकथितस्तुकारणंद्रेष्काणोनिधनस्यसूरिभिः ॥
तस्याधिपतिर्भवोपिवानिर्याणंस्वगुणैःप्रयच्छति ॥

अर्थ—जन्मस्थ द्रेष्काणापासून, बाविसावा द्रेष्काण मृत्यूस कारण होतो; असें पूर्वमुनींनीं सांगितलेलें आहे; त्या द्रेष्काणाचा स्वामी किंवा अष्टमस्थान राशीचा स्वामी आपल्या गुणाप्रमाणें मृत्युदायक होतो, असें जाणावें.

॥ वसंततिलका ॥ १२

होरानवांशकपयुक्तसमानभूमौयोगेक्षणादिभि
रतःपरिकल्प्यमेतत् ॥ मोहस्तुमृत्युसमयेऽनुदि
तांशतुल्यःस्वेशेक्षितेद्विगुणितस्त्रिगुणःशुभैश्च ॥

अर्थ—लग्ननवमांशस्वामी ज्या राशीस असेल त्या राशीसारिखे भूमीवर मृत्यु किंवा तिच्याशीं युक्त किंवा दृष्टि असेलल्या ग्रहांवरून त्या भूमीची कल्पना करावी;—लग्नाचे नवमांश जितके उदयास येणें बाकी असतील तितका वेळपर्यंत मृत्युसमयीं मूर्छा जाणावी;—लग्नस्वामी लग्नास पाहात असेल तर याहून दुप्पट वेळ मूर्छा;—व तो स्वामी जर शुभ ग्रह असेल तर तिप्पट वेळ मूर्छा जाणावी.

॥ मालिनी ॥ १३

दहनजलविमिश्रैर्भस्मसंक्लेदशोषैर्निधनभवनसं
स्थैर्व्यालवर्गैर्विडंब: ॥ इतिशवपरिणामश्चिंतनी
योयथोक्तः पृथुविरचितशास्त्राद्गत्यनूकादिचिंत्यम् ॥

अर्थ—अष्टमस्थानीं जो मृत्यु देणारा द्रेष्काण असेल त्याच्या तत्वगुणाप्रमाणें सर्व परिणाम जाणावा. जसें अग्नि द्रेष्काणानें, जलद्रेष्का०, मिश्रद्रेष्का० व्यालद्रेष्का०; जळून भस्म होणें, सडून जाणें, शोषून सुकून जाणें, विटंबना होणें, शास्त्रांतरीं (भृगुसंहितादि कर्म विपाकादि) विस्तार सांगितलेले आहेत त्यांवरून पूर्व जन्म व पुढील गति यांचे परिणाम जाणावे.

॥ मालिनी ॥ १४

गुरुरुडुपतिशुक्रौसूर्यभौमौयमज्ञौविबुधपितृतिर
श्चोनारकीयांश्चकुर्युः ॥ दिनकरशशिवीर्याधि
ष्ठितात्र्यंशनाथात्प्रवरसमनिकृष्टास्तुंगऱ्हासादनूके ॥

अर्थ—गुरूचा देवलोक, चंद्रशुक्रांचा पितृलोक, सूर्यमंगळांचा तिर्यक्लोक, शनिबुधांचा नरकलोक;—सूर्यचंद्रांमध्यें जो बलवान् त्याच्या द्रेष्काणस्वामीच्या लोकाहून तो प्राणी जन्मास आला असें जाणावें. तो द्रेष्काणस्वामी उच्च, मध्य, नीच जसा असेल तसा त्या लोकीं तो प्राणी श्रेष्ठ, मध्यम, नीच होता असें जाणावें.

॥ मालिनी ॥ १९

गतिरपिरिपुरंध्रत्र्यंशपोऽस्तस्थितोवागुरुरथरिपु केंद्रच्छिद्रग:स्वोच्चसंस्थः ॥ उदयतिभवनेंत्येसौम्य भागेचमोक्षोभवतियदिबलेनप्रोझ्झितास्तत्रशेषाः ॥

अर्थ—षष्ठ, अष्ट, किंवा सप्तम स्थानांच्या द्रेष्काणस्वामीप्रमाणें किंवा त्या स्थानीं असलेल्या ग्रहांप्रमाणें त्या त्या लोकीं गति जाणावी. (श्लो० १४ पहा);—गुरु हा, षष्ठ, अष्ट, किंवा केंद्रीं स्वोच्चस्थ असेल तर;—किंवा मीन राशीस शुभ नवमांशीं असा लग्नीं जर तो गुरु असेल आणि बांकीचे ग्रह बलहीन असतील तर; मोक्षगति जाणावी.

॥ निर्याणाध्यायसंपूर्ण ॥ २३

---

## ॥ नष्टजातकाध्याय ॥ २४



॥ इंद्रवज्रा ॥ १

आधानजन्मापरिबोधकालेसंपृच्छतोजन्मवदेद्विल ग्नात् ॥ पूर्वापरार्धेभवनस्यविंद्याद्भानावुदग्दक्षिण गेप्रसूतिम् ॥

अर्थ—गर्भधारणकाळ, व जन्मकाळ यांची विस्मृति असल्यास प्रश्नवेळेच्या लग्नावरून तो काल उत्पन्न करून सांगावा;—प्रश्न लग्नीं सूर्य हा, राशीचे पूर्वार्धीं

असेल तर उत्तरायणीं जन्म;—व तो उत्तरार्धीं असेल तर दक्षिणायनीं जन्म जाणावें. याप्रकारें सूर्यकल्पना जाणावी.

॥ उपजातिका ॥ २

लग्नत्रिकोणेषुगुरुस्त्रिभागैर्विकल्प्यवर्षाणिवयोनु मानात् ॥ ग्रीष्मोर्कलग्नेकथितास्तुशेषैरन्यायन र्त्तावृतुरर्कचारात् ॥

अर्थ—प्रश्नलग्नीं, प्रथम द्रेष्काण असतां गुरु हा, त्याच राशीस दुसऱ्या द्रेष्काणीं असतां, तेथून पांचवे राशीस; आणि तिसरे द्रेष्काणीं; तेथून नववे राशीस; या प्रकारें गुरूची योजना करावी;—वर्षांची संख्या वयाचे अनुमानावरून सिद्ध करावी;—प्रश्नकाळीं सूर्य हा, लग्नीं असेल तर ग्रीष्म ऋतु; व अन्य ग्रह लग्नीं असतां त्यांचे ऋतु (संज्ञाध्याय पहा) सूर्याचे गतीस अनुकूल असे योजावे.

॥ इंद्रवज्रा ॥ ३

चंद्रज्ञजीवा:परिवर्तनीया:शुक्रारमंदैरयनेवि लोमे ॥ द्रेष्काणभागेप्रथमेतुपूर्वोमासोनुपाता च्चतिथिर्विकल्प्यः ॥

अर्थ—अयनाचे कारणामुळें ऋतुभिन्न होऊं लागल्यास चंद्रास शुक्राचा, बुधास मंगळाचा, गुरूस शनीचा, अशी ऋतूंची फेरबदल करावी;—प्रश्न लग्न प्रथम द्रेष्काणीं असतां ऋतूंचा पहिला मास तो जन्ममास

घ्यावा;—तेंच लग्न दुसरे द्रेष्काणीं असतां दुसरा मास जन्ममास जाणावा;—तिसरा द्रेष्काण असला तर त्याचे दोन भाग करून जन्म मासाची कल्पना करावी;—व त्रैराशिकानें तिथि आणावी.

॥ इंद्रवज्रा ॥ ८

अत्रापिहोरापटवोद्विजेंद्राःसूर्यांशतुल्यांतिथिमुद्दिशंति ॥ रात्रिद्युसंज्ञेषुविलोमजन्मभागैश्चवेलाःक्रमशोविकल्प्याः ॥

अर्थ—या तिथीविषयीं होराशास्त्रकुशल असे मुनिवर्य हे, सूर्याचे भुक्त अंशाइतक्या तिथि घ्याव्या असें सांगतात;—प्रश्न लग्न हें रात्रिसंज्ञक असेल तर दिवसास जन्म;—दिवासंज्ञक असेल तर रात्रीस जन्म;—प्रश्न लग्नाचे भागाचे प्रमाणानें त्या दिवसाचा किंवा रात्रीचा इष्टकाळ हिशेबानें काढावा.

॥ इंद्रवज्रा ॥ ९

केचिच्छशांकाध्युषितान्नवांशाच्छुक्लांतसंज्ञंकथयंतिमासं ॥ लग्नत्रिकोणोत्तमवीर्ययुक्तंसंप्रोच्यतेंगालभनादिभिर्वा ॥

अर्थ—कितीएक (आचार्य) प्रश्नकाळींच्या चंद्राचे भुक्त नवमांशावरून शुक्लांतसंज्ञक मास घेण्यास सांगतात. व लग्न, पंचम, नवम यांतून जें उत्तम बळी असेल त्या स्थानचे राशिस चंद्र कल्पावा. किंवा प्रश्नकर्त्याचे अंग-

स्पर्शादिकांवरून कालांगाप्रमाणें त्या राशीस चंद्राची कल्पना करावी. (अ० १ श्लो० ४ पहा)

॥ इंद्रवज्रा ॥ ६

यावान्गत:शीतकरोविलग्नाच्चंद्राद्वदेत्तावतिज न्मराशि: ॥ मीनोदयेमीनयुगंप्रदिष्टंभक्ष्याहृता कारुतैश्चचिंत्यम् ॥

अर्थ—प्रश्नलग्नापासून जितक्यावे स्थानीं चंद्रमा असेल तितक्यावे राशीस जन्मकाळींचा चंद्रमा कल्पावा;—परंतु जन्मलग्न मीन असेल तर मीनराशीसच चंद्रमा योजावा;—तसेंच प्रश्नकाळीं भक्ष्य पदार्थ, किंवा काहीं आकृति दृष्टीस पडेल किंवा एखादा शब्द ऐकण्यांत येईल त्या प्रमाणावरून चंद्रराशीची कल्पना करावी.

॥ इंद्रवज्रा ॥ ७

होरानवांशप्रतिमंविलग्नंलग्नाद्रविर्यावतिचदृका णे ॥ तस्माद्वदेत्तावतिवाविलग्नंप्रष्टु:प्रसूताविति शास्त्रमाह ॥

अर्थ—प्रश्नलग्नाच्या नवमांशाप्रमाणें जन्मलग्न घ्यावें, किंवा सूर्य हा प्रश्नलग्नाचे द्रेष्काणापासून जितक्यावे द्रेष्काणीं असेल तितक्यावे संख्येइतकें जन्मलग्न कल्पावें, असें शास्त्र सांगतें.

॥ इंद्रवज्रा ॥ ८

जन्मादिशेल्लग्नगेवीर्यगेवाछायांगुलघ्नेर्कहतेवशि

ष्टम् ॥ आसीनसुप्तोत्थिततिष्ठताभंजायासुखाज्ञो
दयगंप्रदिष्टम् ॥

अर्थ—प्रश्नलग्नीं ग्रह असेल त्यास किंवा (कुंडलींत) बळवान् ग्रह असेल त्यास छायांगुलांनीं भागावें. (द्वादशांगुलात्मक शंकु किंवा शलाका) व त्या भागाकारास पुनः बारांचा भाग द्यावा. अवशेष राहील तें मेषापासून लग्न जाणावें;—प्रश्नकर्ता हा, बसला असेल तर प्रश्नलग्नापासून सातवें जन्म लग्न; व निजला असेल तर चतुर्थ स्थान राशी तेंच जन्म लग्न; उठून प्रश्न करील तर दशमस्थान राशी तेंच जन्म लग्न;—उभ्यानेंच प्रश्न करील तर प्रश्नलग्न तेंच जन्म लग्न असें जाणावें.

॥ शार्दूलविक्रीडित ॥ ९

गोसिंहौजितुमाष्टमौक्रियतुलेकन्यामृगौचक्रमात्
संवर्ग्योदशकाष्टसप्तविषयैःशेषाःस्वसंख्यागुणाः ॥
जीवाराःस्फुजिदैंदवाःप्रथमवच्छेषाग्रहाःसौम्यवत्
राशीनांनियतोविधिर्ग्रहयुतैःकार्याचतद्गुणाः ॥

अर्थ—प्रश्नलग्नास (अंशकालात्मक) खालीं दाखविलेल्या अंकांनीं गुणावें; व प्रश्नलग्नीं कोणी ग्रह असतां त्यांचे दाखविलेल्या अंकांनीं पुनः त्या (प्र० ल०) स गुणावें. (खालीं श्लो० ११ स्तव.)

| मे. | वृ. | मि. | क. | सिं. | क. | तू. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७ | १० | ८ | ४ | १० | ५ | ७ | १० | ९ | ५ | ११ | १२ |

| सूर्य. | चंद्र. | मंग. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ | ५ | ८ | ५ | १० | ७ | ५ |

॥ वसंततिलका ॥ १०

सप्ताहतंत्रिघनभाजितशेषमृक्षंदत्वाथवानवविशो
ध्यनवाथवास्यात् ॥ एवंकलत्रसहजात्मजशत्रुभे
भ्य:प्रष्टुर्वदेदुदयराशिवशेनतेषां ॥

अर्थ—प्रश्नलग्नास सातांनीं गुणून सत्ताविसांनीं भागावें. बाकी राहील तें जन्म नक्षत्र, किंवा बाकीसही नवांचा भाग द्यावा (घटीपळांस्तव), किंवा न दिल्यास तसेंच नक्षत्र घ्यावें. याचप्रकारें स्त्री, बंधु, पुत्र, शत्रु या स्थानच्या राशीवरून त्यांचीं नक्षत्रें उत्पन्न करून (अनुभवास्तव) पृच्छकास सांगावीं.

॥ वसंततिलका ॥ ११

वर्षर्तुमासतिथयोद्युनिशंह्युडूनिवेलोदयर्क्षनवभा
गविकल्पना:स्यु:॥भूयोदशादिगुणिता:स्वविकल्प
भक्ताद्वर्षादयोनवकदानविशोधनाभ्याम् ॥

अर्थ—प्रश्नलग्नास वरचे (नववे श्लोकांतील) राशिगुणकांकांनीं गुणून वर्ष, ऋतु, मास, तिथि, दिवस, रात्र, नक्षत्र, लग्ननवमांशाकरितां (दहावे श्लोकांतील) सांगितलेल्या नवांचा भाग देऊन स्वकल्पनेनें ते वर्षादिक उत्पन्न करावे.

॥ अनुष्टुप् ॥ १२

विज्ञेयादशकेष्वब्दाऋतुमासास्तथैवच ॥
अष्टकेष्वपिमासार्द्धास्तिथयश्चतथास्मृता: ॥

अर्थ—प्रश्नलग्नास, दहांचा गुणक देऊन वर्ष, ऋतु, मास आणावे, व आठांचा गुणक (पुनः प्रश्नलग्नास) देऊन पक्ष, तिथि इ० आणावें.

॥ अनुष्टुप् ॥ १३

दिवारात्रिप्रसूतिंचनक्षत्रानयनंतथा ॥
सप्तकेष्वपिवर्गेषुनित्यमेवोपलक्षयेत् ॥

अर्थ—दिवस रात्रीचा जन्म, व नक्षत्रानयन, हें सातांचे गुणकानें (प्रश्नलग्नास) नेहमीं उत्पन्न करावें.

॥ अनुष्टुप् ॥ १४

वेलामथविलग्नंचहोरामंशकमेवच ॥
पंचकेषुविजानीयान्नष्टजातकसिद्धये ॥

अर्थ—इष्टकाळ, जन्मलग्न, होरा, नवमांशादिक हे, प्रश्नलग्नास पांचांचा गुणक देऊन उत्पन्न करावे. या प्रकारें हे गुणक नष्टजातक उत्पन्न करण्यास्तव घ्यावे.

॥ आर्या ॥ १५

संस्कारनाममात्राद्द्विगुणाच्छायांगुलैःसमायुक्ता॥
शेषंत्रिनवकभक्तान्नक्षत्रंतद्धनिष्ठादि ॥

अर्थ—पृच्छकाच्या नांवाचीं अक्षरें (संस्कार झालेलें नांव) मोजून त्यांस द्विगुणित करावें आणि त्यांत छायांगुलें मिळवावीं. त्या एकंदर संख्येस सत्ताविसांनीं भागून शेष राहील तें धनिष्ठादिकांपासून जन्मनक्षत्र मोजावें.

॥ आर्या ॥ १६

द्वित्रिचतुर्दशदशतिथिसप्तत्रिगुणानवाष्टचैंद्राद्याः॥
पंचदशघ्नास्तद्दिङ्मुखान्विताभधनिष्ठादि ॥

अर्थ—पृच्छकाचें मुख ज्या दिशेकडेस असेल त्यावरून जन्मनक्षत्र आणावें, त्याचा प्रकार ;—पूर्वेस २, आग्नेयीस ३, दक्षिणेस १४, नैर्ऋत्येस १०, पश्चिमेस १९, वायव्येस २१, उत्तरेस ९, ईशान्येस ८ याप्रमाणें मुखाचे दिशेचा अंक घेऊन, त्यास पंधरांनीं गुणावें. त्यांत ती दिशाही मिळवावी (पूर्वेपासून १ इ०) व त्या संख्येस सत्ताविसांचा भाग द्यावा. जें शेष राहील तें धनिष्ठादिकांपासून जन्मनक्षत्र जाणावें.

॥ आर्या ॥ १७

इतिनष्टजातकमिदंवहुप्रकारंमयाविनिर्दिष्टं ॥
ग्राह्यमतःसच्छिष्यैःपरीक्ष्ययत्नाद्यथाभवति ॥

अर्थ—हें नष्टजातक, मीं अनेक प्रकारांनीं वर दाखविलें आहे. सच्छिष्यांहीं त्याची यत्नेंकरून परीक्षा करावी, व जें योग्य असेल तेंच ग्रहण करावें.

॥ नष्टजातकाध्याय संपूर्ण ॥ २३

---

## ॥ द्रेष्काणस्वरूपाध्यायः ॥ २४



॥ राशींच्या तिसऱ्या भागाचीं स्वरूपें ॥

॥ वैतालिका ॥ १, २, ३

कट्यांसितवस्त्रवेष्टितः कृष्णः शक्तइवाभिरक्षितुंरौद्रः ॥ फरशुंसमुद्यतंधत्तेरक्तलोचनः पुमान् ॥ १ ॥ इंद्रवज्रा ॥ रक्तांबराभूषणभक्ष्य

चिताकुंभाकृतिर्वाजिमुखीतृषार्ता ॥ एकेनपादे
नचमेषमध्येद्रेष्काणरूपंयवनोपदिष्टं ॥ २ ॥
इंद्रवज्रा ॥ क्रूरःकलाज्ञःकपिलःक्रियार्थीभग्नव्र
तोभ्युद्यतदंडहस्तः॥ रक्तानिवस्त्राणिबिभर्तिचं
डोमेषेतृतीयःकथितस्त्रिभागः ॥

अर्थ—मेषराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— कमरेस शुभ्र वस्त्र वेष्टित, कृष्णवर्ण, रक्षणसमर्थ, भयंकर, परशु उगारलेला, आरक्तनेत्र, असा पुरुष.

द्वि०— तांबडें वस्त्र नेसलेली, भूषणें व भक्ष्यामध्यें चित्त, कुंभाकृति, अश्वमुखी, तृषित, एकपादा, अशी स्त्री, असें यवनाचार्य यांहीं सांगितलें आहे.

तृ०— क्रूर, कलाकुशल, पिंगट, कार्योत्सुक, व्रतभग्न, दंड उगारलेला, रक्तवस्त्रधारी, क्रोधी, असा पुरुष.

॥ दोधक ॥ ४, ५, ६

कुंचितलूनकचाघटदेहादग्धपटातृषिताशनचि
त्ता ॥ आभरणान्यभिवांच्छतिनारीरूपमिदंवृ
षभेप्रथमस्य ॥ ४ ॥ स्वागता ॥ क्षेत्रधान्यगृह
धेनुकलाज्ञोलांगलेसशकटेकुशलश्च ॥ स्कंधमु
द्वहतिगोपतितुल्यंक्षुत्परोजवदनोमलवासाः॥५॥
दोधक॥ द्विपसमकायःपांडुरदंष्ट्रःशरभसमांघ्रिः
पिंगलमूर्तिः ॥ अविमृगलोभव्याकुलचित्तोवृ
षभवनस्यप्रांतगतोयं ॥ ६ ॥

अर्थ—वृषभराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— कुटिल व कापलेले असे केश, कुंभाकृति, दग्धवस्त्रा, तृषिता, भक्षणतत्पर, भूषणेच्छु, अशी स्त्री.

द्वि०— क्षेत्र, धान्य, गृह, गाई, नांगर, गाडें, आणि कला,ज्ञान, यांत प्रवीण व बैलासारिखें खांद्यावर ओझें, क्षुधित, बोकडासारिखें तोंड, मळकीं वस्त्रें असा पुरुष.

तृ०— हत्तीसारिखें शरीर स्थूळ, श्वेतदंत, स्थूलपाद, पिंगट, एडके, मृग यांचे प्राप्तीविषयीं उत्सुक, असा पुरुष.

॥ वसंततिलका ॥ ७, ८, ९

सूच्याश्रयंसमभिवांच्छतिकर्मनारीरूपान्विता
भरणकार्यकृतादराच ॥ हीनप्रजोच्छ्रितभुजार्तु
मतीत्रिभागमाद्यंतृतीयभवनस्यवदंतितज्ज्ञाः॥७॥
उपजातिका ॥ उद्यानसंस्थःकवचीधनुष्मान्शू
रोस्त्रधारीगरुडाननश्च ॥ क्रीडात्मजालंकर
णार्थचिंताकरोतिमध्येमिथुनस्यराशेः ॥ ८ ॥
स्वागता॥ भूषितोवरुणवद्बहुरत्नोबद्धतूणकव
चःसधनुष्कः ॥ नृत्तवादित्तकलासुचविद्वान्
काव्यकृन्मिथुनराश्यवसाने ॥ ९ ॥

अर्थ—मिथुनराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— सुईनें शिवणकाम करण्याची प्रीति (कशिदा

इ०), स्वरूपवान्, भूषणें मिळण्याविषयीं आर्जवी, प्रजाहीन, हात वर केलेली, ऋतुमती, अशी स्त्री. हें असें स्वरूप होराशास्त्रज्ञ सांगतात.

द्वि०— बागेमध्यें राहणारा; कवच, धनुष्य धारण केलेला; शूर; शस्त्रधारी; गरुडमुख ; क्रीडा, धन, भूषणें, मुलें, यांची चिंता, असा पुरुष.

तृ०— वरुणासारिखा बहुरत्नभूषित; भाता, धनुष्य, कवच, बाण, अशीं धारण केलेला; नृत्य, वाद्य, कला, यांमध्यें कुशल; काव्यकर्ता; विद्वान् ; असा पुरुष.

॥ स्वागता ॥ १०, ११, १२

पत्रमूलफलभृद्द्विपकाय:काननेमलयग:शरभांघ्रि: ॥ क्रोडतुल्यवदनोहयकंठ:कर्कटेप्रथमरूपमुशंति ॥ १० ॥ इंद्रवज्रा ॥ पद्मार्चितामूर्द्धनिभोगियुक्तास्त्रीकर्कशारण्यगताविरौति ॥ शाखापलाशस्यसमाश्रिताचमध्यस्थिताकर्कटकस्यराशे: ॥ ११ ॥ वैतालिका ॥ भार्याभरणार्थमर्णवंनौस्थोगच्छतिसर्पवेष्टित: ॥ हैमैश्चयुतोविभूषणैश्चिपिटास्योंत्यगतश्चकर्कटे ॥ १२ ॥

अर्थ—कर्कराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— पानें, फळें, मूळें, हीं धारण केलेला; हत्तीसारिखें शरीर ; मलयवनामध्यें गेलेला, शरभासमान पाय; डुकरासारिखें तोंड; घोड्यासारिखी मान असा पुरुष.

द्वि०— शिरावर कमळें वाहिलेली, सर्पयुक्ता, कर्कशा, अरण्यामध्यें आक्रोश करणारी, पळसाचे खां-दीचे आश्रयानें असलेली, अशी स्त्री.

तृ०— स्त्रियेच्या अलंकारप्राप्तीस्तव समुद्रांत नौकेमध्यें जाणारा, सर्पवेष्टित, सुवर्णालंकारांनीं युक्त, चि-पिटमुख, असा पुरुष.

॥ रथोद्धता ॥ १३, १४, १५

शाल्मलेरुपरिगृध्रजंबुकौश्वानरश्चमलिनांबरा न्वित:॥ रौतिमातृपितृविप्रयोजित:सिंहरूपमिद माद्यमुच्यते॥१३॥वंशस्था॥ हयाकृति:पांडुरमा ल्यशेखरोविभर्तिकृष्णाजिनकंबलंनर:॥दुरास द:सिंहइवात्तकार्मुकोनताग्रनासोमृगराजमध्य म:॥१४॥उपजातिका॥ ऋक्षाननोवानरतुल्यचे ष्टोबिभर्तिदंडंफलमामिषंच ॥ कूर्चीमनुष्य:कु टिलैश्चकेशैर्मृगेश्वरस्यांत्यगतस्त्रिभाग: ॥१५॥

अर्थ—सिंहराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— सांवरीचे वृक्षावर गृध्र, जंबुक, श्वान, यांसह-वर्तमान; मळकीं वस्त्रें, मातापित्यांचे वियोगानें आक्रोश करणारा, असा पुरुष.

द्वि०— अश्वाकृति, शिरावर पांढरें पुष्प, कृष्णाजिन, कांबळ, अशीं घेतलेला; सिंहासारिखा भयंकर, धनुषयुक्त, नाकाचा शेंडा वांकडा लवलेला, असा पुरुष.

तृ०— मांकटतोंड, वानरासारिखे चाळे ; मांस, दंड, फळें अशीं धारण केलेला, कूर्ची (मुखावरील केश दीर्घ, व कुटिल) असा पुरुष.

॥ उपजातिका ॥ १६, १७, १८

पुष्पप्रपूर्णेनघटेनकन्यामलप्रदिग्धांबरसंवृतांगी॥ वस्त्रार्थसंयोगमभीप्समानागुरोःकुलंवांच्छतिकन्यकाधः ॥ १६ ॥ वैतालिका ॥ पुरुषःप्रगृहीतलेखनिःश्यामोवस्त्रशिरोऽव्ययायकृत् ॥ विपुलंचविभर्तिकार्मुकंरोमव्याप्ततनुश्चमध्यमः ॥ १७ ॥ उपजातिका ॥ गौरीसुधौताग्रदुकूलगुप्तासमुच्छ्रिता कुंभकटच्छुहस्ता ॥ देवालयंस्त्रीप्रयताप्रवृत्तावदंतिकन्यांत्यगतस्त्रिभागः ॥ १८ ॥

अर्थ—कन्याराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— पुष्पयुक्त घटासह, मळकीं वस्त्रें शरीरास आच्छादून, वस्त्रें व धन यास्तव गुरुकडेस जाणारी अशी कुमारिका.

द्वि०—हातीं लेखनी, डोक्यास वस्त्र गुंडाळलेलें, पुष्कळ देवघेव करणारा, धनुष्यधारी; शरीर केंसाळ, असा पुरुष.

तृ०— गौरवर्ण, सुंदर, धौतवस्त्रामध्यें झांकर बांध्याची, हातांत कुंभ व पळी घेतलेआयतमा यांसह देवालयास जाण्यास उद्युक्त अपूर्वोध

॥ वसंततिलका ॥ १९, २०, २१

वीथ्यंतरापणगत:पुरुषस्तुलावानुन्मानमानकुश
ल:प्रतिमानहस्त:॥भांडंविचिंतयतितस्यचमूलमे
तद्रूपंवदंतियवना:प्रथमंतुलाया:॥१९॥त्रोटक॥
कलंशंपरिगृह्यविनि: पतितुंसमभीप्सतिगृध्रमु
ख:पुरुष: ॥ क्षुधितस्तृषितश्चकलत्रसुतान्मन
सैतितुलाधरमध्यगत: ॥ २० ॥ वंशस्था ॥
विभीषयन्तिष्ठतिरत्नचित्रितोवनेमृगान्कांचनतू
र्णवर्मभृत् ॥ फलामिषंवानररूपभृन्नरस्तुलाव
सानेयवनैरुदाहृत: ॥

अर्थ—तुळाराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— बाजारचे मार्गानें जाणारा, तुळायुक्त, हिशेबा-मध्यें प्रवीण, किमतीचा पदार्थ हातांत घेऊन याची किंमत इतकी अशी कल्पना करितो आहे, असा पुरुष.

द्वि०— गृध्रमुख, कलश घेऊन, कांहीं पडलें काय ? अशा संशयांत, क्षुधित व तृषित, स्त्री पुत्रांचें स्मरण करीत होत्साता, गमन करितो आहे, असा पुरुष.

तृ०— [illegible]नीं सुशोभित, सुवर्णमय भाता, कवच धारण करणारा; वनामध्यें मृगांस भिववीत उभा; वान-र[illegible]प; फळें व मांस घेतलेला असा पुरुष, असें [illegible]रूप यवनाचार्य सांगतात.

॥ उपजातिका ॥ २२, २३, २४

वस्त्रैर्विहीनाभरणैश्चनारीमहासमुद्रात्समुपैतिकू
लं ॥ स्थानच्युतासर्पनिबद्धपादामनोरमावृश्चि
कराशिपूर्वः ॥ दोधक ॥ स्थानसुखान्यभिवां
च्छतिनारीभर्तृकृतेभुजगावृतदेहा ॥ कच्छपकुंभ
समानशरीरावृश्चिकमध्यमरूपमुशंति॥पुष्पिता
ग्रा ॥ पृथुलचिपिटकूर्मतुल्यवक्त्रः श्वमृगवराह
सृगालभीषकारी ॥ अवतिचमलयाकरप्रदेशं
मृगपतिरंत्यगतस्यवृश्चिकस्य ॥

अर्थ—वृश्चिक राशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— वस्त्राभरणांनीं हीन, महासागरांतून तीरीं येत आहे, स्थानभ्रष्ट, पायांस सर्प वेष्टन, मनोहर, अशी स्त्री.

द्वि०— पतीस्तव स्थान व सुख यांची प्राप्ति इच्छिते, शरीरास भुजंगवेष्टन, कासव व कुंभासारिखें शरीर, अशी स्त्री.

तृ०— पसरट, चपटें, कासवासारिखें असें मुख; श्वान, मृग, कोल्हे, डुकरें यांस भयंकर; मलयचंदनाचा प्रदेश रक्षिता असा सिंह.

॥ इंद्रवज्रा ॥ २५, २६, २७

मनुष्यवक्त्रोऽश्वसमानकायोधनुर्विगृह्यायतमा
श्रमस्थः॥क्रतूपयोज्यानितपस्विनश्चररक्षपूर्वोध

नुषस्त्रिभागः ॥ उपजातिका ॥ मनोरमाचंपक हेमवर्णाभद्रासनेतिष्ठतिमध्यरूपा ॥ समुद्ररत्नानिविघट्टयंतीमध्यत्रिभागोधनुषः प्रदिष्टः ॥ उपजातिका ॥ कूर्चीनरोहाटकचंपकाभोवरासनेदंडधरोनिषण्णः॥कौशेयकान्युद्वहतेऽजिनंचतृतीयरूपंनवमस्यराशेः ॥

अर्थ०—धनराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— मनुष्यमुख, अश्वसमानशरीर, दीर्घ धनुष्य घेऊन स्वस्थानीं यज्ञाची योजना व तपस्व्यांचे रक्षणीं तत्पर, असा पुरुष.

द्वि०— मनोहर, सुवर्णचंपकासारिखा वर्ण, श्रेष्ठासनीं बसलेली, मध्यमरूपा, समुद्रांतील रत्नें गुंफिते अशी स्त्री.

तृ०— दीर्घश्मश्रु, सोनचांफ्याचे पुष्पासारिखा वर्ण, श्रेष्ठासनस्थ, दंडधारी, रेशमी वस्त्रें, व कृष्णाजिन धारण केलेला असा पुरुष.

॥ दोधक ॥ २८, २९, ३०

रोमचितोमकरोपमदंष्ट्रःसूकरकायसमानशरीरः ॥ योक्त्रकजालकबंधनधारीरौद्रमुखोमकरप्रथमस्तु ॥ उपजातिका ॥ कलास्वभिज्ञाब्जदलायताक्षीश्यामाविचित्राणिचमार्गमाणा ॥ विभूषणालंकृतलोहकर्णायोषाप्रदिष्टामकरस्यम

ध्ये ॥ रथोद्धता ॥ किन्नरोपमतनुःसकंबलस्तू
णचापकवचैःसमन्वितः ॥ कुंभमुद्वहतिरत्न
चित्रितंस्कंधगंमकरराशिपश्चिमः ॥

अर्थ—मकरराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— शरीर केसाळ, मगरीसारिखे दांत, डुकरासारिखें शरीर, बैल बांधण्याचीं दोरखंडें, जाळीं, बंधनें, इत्यादिक धारण केलेला, भयंकरमुख, असा पुरुष.

द्वि०— कलाभिज्ञ, कमळपत्रासारिखे विशाळ नेत्र, श्यामवर्ण, विचित्र वस्तूंची याचना करणारी, भूषणें ल्यालेली, लोहयुक्त कर्ण, अशी स्त्री.

तृ०— अश्वमुख; कांबळी, भाता, धनुष्य, कवच यांहीं युक्त; रत्नखचित कुंभ खांद्यावर घेतलेला असा पुरुष.

॥ दोधक ॥ ३१, ३२, ३३

स्नेहमद्यजलभोजनागमव्याकुलीकृतमनाःसकं
बलः ॥ कोशकारवसनोजिनान्वितोगृध्रतुल्य
वदनोघटादिगः ॥ वैतालिका ॥ दग्धेशकटेस
शाल्मलेलोहान्याहरतेंगनावने ॥ मलिनेनपटे
नसंवृताभांडैर्मूर्ध्निगतैश्चमध्यभः ॥ इंद्रवज्रा ॥
श्यामःसरोमश्रवणः किरीटीत्वक्पत्रनिर्यासफ
लैर्बिभर्ति ॥ भांडानिलोहव्यतिमिश्रितानिसं
चारयत्यंत्यगतोघटस्य ॥

अर्थ—कुंभराशीच्या द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— तैल, मद्य, जल, भोजन, हीं प्राप्त होण्याविषयीं चित्त व्याकुळ; कांबळी, रेशमी वस्त्रें, कृष्णाजिन यांहीं युक्त; गृध्रासारिखें मुख, असा पुरुष.

द्वि०— शाल्मलि वृक्षाचे ठायीं दग्ध शकटासह वनामध्यें लोखंड गोळा करितो, मलिनवस्त्र वेष्टित, मस्तकावर भांडें घेतलेली, अशी स्त्री.

तृ०— श्यामवर्ण, कानावर केंस, मुगुटधारी; दालचिनी, लोवन, फळें, यांसह; लोखंडी भांडीं यांची ने, आण, करणारा, असा पुरुष.

॥ इंद्रवज्रा ॥ ३४, ३५, ३६

स्रुग्भांडमुक्तामणिशंखमिश्रैर्व्याक्षिप्तहस्तः स विभूषणश्च ॥ भार्याविभूषार्थमपांनिधानंनावा प्लवत्यादिगतोझषस्य ॥ वसंततिलका ॥ अत्युच्छ्रितध्वजपताकमुपैतिपोतंकूलंप्रयातिजलधेःपरिवारयुक्ता ॥ वर्णेनचंपकमुखाप्रमदात्रिभागो मीनस्यचैषकथितोमुनिभिर्द्वितीयः ॥ इंद्रवज्रा ॥ श्वभ्रांतिकेसर्पनिवेष्टितांगोवस्त्रैर्विहीनःपुरुषस्त्वटव्यां ॥ चोरानलव्याकुलितांतरात्माविक्रोशतेंत्योपगतोझषस्य ॥

अर्थ—मीनराशिस्थ द्रेष्काणांचीं स्वरूपें.

प्र०— यज्ञांतील भांडीं, मोत्यें, शंख इ० मिश्र असे

पदार्थ हातामध्यें असून कळ लागलेला; स्त्री, भूषणें, मिळण्यास्तव समुद्रामध्यें, नौकेंत वसून, जात आहे असा पुरुष.

द्वि०—अतिउंच असें शीड उभारलेल्या गलबतामध्यें वसून समुद्राचे तीराशीं येत आहे, परिवारयुक्त, चंपकासारिखें मुख व वर्ण, अशी स्त्री.

तृ०— बिळापाशीं सर्पवेष्टित, वस्त्रहीन, वनामध्यें चोर व अग्नि यांहींकरून अंतरात्मा व्याकुळ होत्साता आक्रोश करीत आहे, असा पुरुष.

॥ द्रेष्काणस्वरूपाध्याय संपूर्ण ॥ २५

---

## ॥ उपसंहाराध्यायः ॥ २६

### ॥ ग्रंथसमाप्ति ॥

॥ उपजातिका ॥ १, २, ३

राशिप्रभेदोग्रहयोनिभेदोवियोनिजन्माथनिषेककालः॥ जन्माथसद्योमरणंतथायुर्दशाविपाकोष्टकवर्गसंज्ञः ॥ शालिनी ॥ कर्माजीवोराजयोगाःखयोगाश्चांद्रायोगाद्विग्रहाद्याश्चयोगाः ॥ प्रव्रज्याथोराशिशीलानिदृष्टिर्भावस्तस्मादाश्रयोथप्रकीर्णः ॥शालिनी॥ अनिष्टयोगाजातकंकामिनी

नांनिर्याणंस्यान्नष्टजन्मद्रेकाणः ॥ अध्यायानां विंशतिःपंचयुक्ताजन्मन्येतद्यात्रिकंचाभिधास्ये ॥

अर्थ—१ राशिप्रभेद, २ ग्रहयोनिभेद, ३ वियोनिजन्म, ४ निषेककाल, ५ जन्म, ६ रिष्ट, ७ आयुर्दाय, ८ दशाविपाक, ९ अष्टकवर्ग, १० कर्माजीव, ११ राजयोग, १२ नाभसयोग, १३ चंद्रयोग, १४ द्विग्रहयोग, १५ प्रव्रज्या, १६ राशिशील, १७ दृष्टिफल, १८ भावफल, १९ आश्रययोग, २० प्रकीर्णयोग, २१ अनिष्टयोग, २२ स्त्रीजातक, २३ निर्याण, २४ नष्टजन्म, २५ द्रेष्काणस्वरूप. याप्रकारें पंचवीस अध्याय या जातकाचे आहेत. आतां यात्रिकाचे सांगतों.

॥ उपजातिका ॥ ४, ५

प्रश्नास्तिथिर्भंदिवसः क्षणश्चचंद्रोविलग्नंत्वथल ग्नभेदः ॥ शुद्धिर्ग्रहाणामथचापवादोविमिश्रका ख्यंतनुवेपनंच ॥ ४ ॥ अतःपरंगुह्यकपूजनंस्या त्स्वप्नंततःस्नानविधिःप्रदिष्टः ॥ यज्ञोग्रहाणामथ निर्गमश्चक्रमाच्चदिष्टःशकुनोपदेशः ॥

अर्थ—१ प्रश्न, २ तिथि, ३ नक्षत्र, ४ दिवस, ५ क्षण, ६ चंद्र, ७ लग्न, ८ लग्नभेद, ९ ग्रहशुद्धि, १० अपवाद, ११ मिश्रक, १२ देहस्फुरण, १३ गुह्यकपूजन, १४ स्वप्न, १५ स्नानविधि, १६ ग्रहयज्ञ, १७ निर्गम, १८ शकुनोपदेश, असे क्रमेंकरून अध्याय आहेत.

॥ उपजातिका ॥ ६

विवाहकालःकरणंग्रहाणांप्रोक्तंपृथक्तद्विपुलाच
शाखा ॥ स्कंधैस्त्रिभिर्ज्योतिषसंग्रहोयंमयाकृतो
दैवविदांहिताय ॥

अर्थ—विवाहपटल, व ग्रहांचा करणग्रंथ (पंचसिद्धांत) यांचे अध्याय बहुत आहेत यास्तव त्यांत सांगितलेले आहेत. याप्रकारें मी त्रिस्कंध ज्योतिषाचा संग्रह दैवज्ञ जे त्यांचे हितास्तव केला आहे.

॥ मालिनी ॥ ७

पृथुविरचितमन्यैःशास्त्रमेतत्समस्तंतदनुलघुमये
दंतत्प्रदेशार्थमेव ॥ कृतमिहहिसमर्थंधीविषाणा
मलत्वेममयादिहयदुक्तंसज्जनैःक्षम्यतांतत् ॥

अर्थ—अन्य आचार्यांहीं हें शास्त्र सर्व प्रकारें विस्तारें करून रचिलेलें आहे. त्या विस्तृत अशा शास्त्राचें ज्ञानास्तव, व बुद्धीच्या शृंगास निर्मलत्व आणण्यास थोडक्यांत समर्थ असें हें जातक मी केलें आहे. यामध्यें जें जें अयुक्त सांगितलेलें असेल त्याची सज्जनांहीं क्षमा करावी.

॥ वसंततिलका ॥ ८

ग्रंथस्ययत्प्रचरतोस्यविनाशमेतिलेख्याद्बहुश्रुत
मुखाधिगमक्रमेण ॥ यद्वामयाकुकृतमल्पमिहा
कृतंवाकार्यंतदत्रविदुषापरित्यरागम् ॥

अर्थ—या ग्रंथाच्या प्रचारेंकरून ह्यांतील लेख्यसंबंधानें जें कांहीं नष्ट होईल ; तें बहुश्रुत अशांचे मुखापासून, क्रमानें समजून घ्यावें. तसेंच मजकडून वाईट, किंवा अल्प किंवा इच्छित, असें झालेलें असेल, तेंही विद्वानांनीं मत्सरभाव सोडून तेंच चांगलें व पूर्ण असें करावें.

॥ वसंततिलका ॥ ९

आदित्यदासतनयस्तदवाप्तबोध:कापित्थकेसवि
तृलब्धवरप्रसाद: ॥ आवंतिकोमुनिमतान्यवलो
क्यसम्यक्होरांवराहमिहिरोरुचिरांचकार ॥

अर्थ—कापित्थाख्य (काल्पी) ग्रामीं आदित्यदासाचा मी पुत्र, त्याजपासून ज्ञानप्राप्ति करून, श्री सूर्यनारायणाचा वरप्रसाद प्राप्त होत्साता, आवंतिकस्थ (उज्जयनीस्थ) असा मुनींचीं मतें अवलोकन करून हें श्रेष्ठ जातक (बृहज्जातक) मी वराहमिहिर शोभायमान असें करिता झालों.

॥ आर्या ॥ १०

दिनकरमुनिगुरुचरणप्रणिपातकृतप्रसादमति
नेदं ॥ शास्त्रमुपसंगृहीतंनमोस्तुपूर्वप्रणेतृभ्य: ॥

अर्थ—श्रीदिनकर, मुनि, गुरु, यांचे चरणीं नमस्कार करून, त्यांच्या अनुग्रहबुद्धीनें हें शास्त्रसंग्रहण मी केलें. तस्मात् त्या पूर्व शास्त्रकारांसही माझें नमन असो.

॥ उपसंहाराध्यायसंपूर्ण ॥ २६

॥ इति श्रीवराहमिहिराचार्यकृतं बृहज्जातकं संपूर्णं ॥

स्यमहाराष्ट्रभाषायांभट्टोत्पलटीकाधारेणभाषांत
रंगद्वंसुगमंकृतंमाधवरावब्रह्माजीमाध्यंजिनयजुः
शाखीयब्रह्मकुलोत्पन्ननिजामपूरकरेत्युपनामवा
स्तव्यसंगमनेरेतिग्रामेणजातकशास्त्रस्यअज्ञजनमि
थ्याभ्रमनिरसनार्थंलोकोपकृतिहेतुनाकृतमिदंसंपूर्णं॥

शालिवाहन शके १७९६ भावनामसंवत्सरे



बृहज्जातक समाप्त.

